# ग्रहगणित मालिका

संपादक
कै. द. वें. केतकर




अनुक्रमणिका

मराठी ज्योतिर्गणित पुस्तकावलि, क्रमांक दोन

# ग्रहगणित

अथवा

सूर्य, चंद्र व ग्रह यांच्या गणिताचीं कोष्टकें, पद्धति व उदाहरणें यांसह

महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाच्या अनुदान प्रोत्साहनानें
संस्कार व कोष्टकें वाढवून संपादिलेली

संपादक : कं. द. वें. केतकर, बी.ए.,बी.टी.

१९६९

अनुक्रमणिका

| उपस्कर | दिनांक | स्वाक्षरी |
|---|---|---|
| दार | २।१।६० | [illegible] |
| प्रथमावृत्ति इ. स. १९१४ | २।१।६० | [illegible] |
| द्वितीयावृत्ति इ. स. १९६९ | २।१।६० | [illegible] |
| तपासले | | |


प्रकाशक : महाराष्ट्र साहित्य व संस्कृति मंडळ,
सचिवालय, मुंबई-३२

मुद्रक : व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय
तथा ग्रंथागार, नागपूर





सजावट : कला विभाग, शासकीय मुद्रण
आणि लेखनसामग्री संचालनालय.



अनुक्रमणिका

जन्म : शके १७३६ : पैठण

मृत्यु : शके १७९२ : बेळगांव

# अर्पणपत्रिका

---

श्री

ज्योतिःशास्त्रसुबोधिनी, भूगोल, खगोल हे संस्कृत ग्रंथ ज्यांनीं रचिले आहेत असे जे माझे परमपूज्य वडील

**कै. ती. रामकृष्ण सखाराम ऊर्फ बापूशास्त्री केतकर**

त्यांच्या शतवार्षिक जन्मदिवसाचें

स्मारक समजून पितृप्रेमभरानें

हें पुस्तक

त्यांच्या पूज्य चरणीं अर्पण केलें आहे.

पौष शुद्ध १५ शके १८३६

पुस्तककर्ता



अनुक्रमणिका

आसेतुहिमाचल

भारतीय ज्योतिर्वित्समाजाचे

चिरकल्याणकारी



ज्योतिर्विदाचार्य

श्री. वेंकटेश बापूजी केतकर

मूळ ग्रंथाचे कर्ते

जन्म १८५४ | मृत्यु १९३०

अनुक्रमणिका

## Opinion of Shri Harihar P. Bhatta of Ahmedabad on the Press Copy of the Book "Marathi Grahaganit" by Late Ketkar

The book has become very good and deserves publishing. Though this second edition of the book has been based on its first edition, this new edition contains so many changes and additions as compared with the old one, that it has almost become a new book altogether. 90 per cent of the book consists of tables and 10 per cent their explanations. If this explanation 10 per cent be translated into Hindi and added to the book, besides the original Marathi, the book will be useful to the whole of India, because the headings of the tables are in Sanskrit words and the tables are given in the Devnagari script of the numbers contained in them, or the Hindi translation of the Marathi explanation may be given in a separate pamphlet which will be very small size.

The general execution of the book is also very nice. The author of this new edition is learned in his subject and has an additional advantage of being a devoted son of the author of the first edition the Late V. B. Ketkar, a renowned Astronomer of India. And as such the present author has done his work with a sentiment of devotion to his worthy father. This has made him apply utmost labour and attention to his work, which would have been impossible otherwise and added greatly to the quality of the work.

अनुक्रमणिका

# PREFACE

When an intelligent student or an amateur happens to read a book on astronomy which describes the motions, distances, appearances, physical conditions, etc., of the Sun, the Moon, the Planets and the Comets, or when he comes across an Almanac which gives the positions of these heavenly bodies, the times of their meridian passage, their apparent discs, etc., the instants of the first and last contacts of the Solar and Lunar Eclipses, he naturally asks to himself how it is possible for men on Earth to predict these celestial phenomena. His curiosity to unravel this mystery is highly excited. But it often happens that, although he may possess natural aptitude for the pursuit of this Grand Science he is forced to give up his object in dispair for want of suitable books. The planetary Tables of Leverrier and the Lunar Tables of Hansen which are written in French, are voluminous and costly. Their total cost exceeds Rs. 100. The prices of theoretical works are also similarly prohibitive. Besides, these books presuppose a scholarly knowledge of the higher Mathematics in the reader.

My object in writing this little book is, in the first place, to enable a beginner to calculate the various articles of an Almanac with a sound knowledge of the theory of the processes involved in them, and secondly, to encourage him to carry on undeterred, the study of the most profound problems of the Celestial Mechanics. I, however, leave it to the students and savants themselves to say how far I have been successful in my efforts. Should this book meet with general appreciation, I shall feel encouraged to produce, though late, some of the other tracts and books of the Astro-Mathematical Series.

**V. B. Ketkar,**
*The Author.*

*Poona, September 1914.*

# प्रस्तावना

**अप्रत्यक्षाणि शास्त्राणि विवादास्तेषु केवलम् ।**
**प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं चंद्रार्कौ यत्र साक्षिणौ ॥**

**श्रेष्ठत्व व उपयोग.**

न्यायवेदान्तादिशास्त्रें केवळ मानवी तर्कावर उभारलेलीं असल्यामुळें त्यांतील सिद्धान्त बहुश: वादग्रस्त असतात, पण ज्योति:शास्त्राची गोष्ट तशी नाहीं. यांतील सिद्धान्तांच्या सत्यतेबद्दल साक्ष देण्यास सूर्यचंद्रादि दिव्य गोल आणि नक्षत्रें नेहमीं तत्पर असतात, म्हणून हें शास्त्र पूर्वोक्त शास्त्रांपेक्षां श्रेष्ठ आहे. कृषि, व्यवहार, उद्योग, व्यापार, आचार, धर्म, इत्यादि गोष्टी योग्य कालीं केल्या तरच त्या सफळ होतात ; व त्या योग्य कालाचा निश्चय करणें ज्योति:शास्त्राचें काम आहे, म्हणून या शास्त्राची थोरवी व उपयोग इतर शास्त्रांपेक्षां जास्त आहे.

**मनावर परिणाम.**

या शास्त्राच्या अध्ययनापासून मन शुद्ध होतें आणि सारासारविचारशक्तीला चांगलें वळण लागतें. याचा विषय विश्व हा असल्यामुळें विश्व रूप पाहून अर्जुनाच्या मनावर जो परिणाम झाला तोच परिणाम या शास्त्राच्या अध्ययना-पासून वाचकांच्या मनावर होतो. विश्वापुढें आपण किती क्षुल्लक व पामर आहों हें पक्कें कळलें म्हणजे वृथाभिमान, दुराग्रह, दंभ, स्वार्थ, असूया, अविचार, इत्यादि मनोविकारांचा जोर उत्तरोत्तर कमी होत जाऊन मन प्रशांत, समदर्शी व सत्यप्रिय होऊं लागतें आणि विश्वनियंत्या परमेश्वराविषयीं भक्ति व प्रेम हीं उत्पन्न होतात.

**प्राचीन स्थिति.**

प्राचीन काळीं ग्रहांच्या कक्षांच्या आकृति आणि त्यांच्या गतींचे नियम यांविषयीं वास्तविक ज्ञान नसल्यामुळें आणि वेधाचीं यंत्रें बरींच ढोबळ असल्यामुळें गणिताची सूक्ष्म प्रतीति पाहण्यास मार्ग नसे. ग्रहणें एक दोन घटिकांच्या अंतरानें जेमतेम प्रत्ययाला आलीं म्हणजे मिळविलें अशी तेव्हां स्थिति होती व हल्लींदेखील आमच्या देशांत अशीच दु:स्थिति आहे. ग्रहलाघवावरून वर्तविलेलीं ग्रहणें चुकतात हा बोभाटा विश्वनाथ दैवज्ञाच्या कालापासूनच आहे. ग्रहस्थितीविषयीं तर बोलण्याला नकोच.

**वर्तमान अनास्था.**

ज्योति:शास्त्रासंबंधीं आमची वर्तमान स्थिति फारच काकळूत येण्याजोगी झाली आहे. प्राचीन कालीं सुधारणा करण्यास मार्गच नव्हता. पण ब्रिटिश राष्ट्रासारख्या सुधारलेल्या राष्ट्राच्या छत्राखालीं आपण शंभर वर्षें असूनहि त्यांच्या ज्ञानाचा फायदा न घेणें ही आमची चूक केवळ अक्षम्य आहे. पाश्चात्यांचें ज्योतिष हल्लीं पूर्णदशेस पोचलें आहे. त्यांच्या पंचांगांतील ग्रहणांच्या स्पर्शमोक्षकालांत पाव पळापेक्षां जास्त अंतर पडत नाहीं. ग्रहांच्या स्थानांत फार झालें तर ७/८ विकला अंतर पडतें. पण आमच्या ग्रहलाघवी पंचांगाकडे पाहा. ग्रहणांच्या स्पर्शमोक्षकालांत १/२ घटिकांचें अंतर बहुश: असावयाचेंच. पंचांगांत ग्रहण दिलेलें

अनुक्रमणिका

असून तें घडूं नये, आणि दिलेलें नसतांही तें घडावें अशीही प्रसंग केव्हां केव्हां येतात. यंदाचीं (शके १८३६) ग्रहणें अशा प्रसंगाचीं ताजीं उदाहरणें आहेत. ग्रहस्थानें तर २/४ अंश चुकलेलीं असतात. नांव भरतखंड पण काशीपासून रामेश्वरापर्यंत एकदेखील वेधशाळा नसावी यापेक्षां जास्त आश्चर्याची गोष्ट कोणती ? ग्रहणें, अस्तोदय या सहज दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या गोष्टी चुकलेल्या पाहून तेवढ्या वेळेपुरतें आश्चर्य व हळहळ करावी आणि पुन्हा चुकलेल्या पंचांगाप्रमाणें नित्यक्रम चालूं ठेवावा ही लज्जास्पद गोष्ट हल्लीं आमच्या अगदीं अंगवळणीं पडून गेली आहे. अष्टम्यंत तर १०/१५ घटिकांनीं चुकलेला असतो.

**प्रस्तुत ग्रंथाचा हेतु.**

आमच्या देशांत ज्योतिःशास्त्राची उपपत्ति जाणणाऱ्या विद्वानांचा वर्ग उत्पन्न झाल्याशिवाय शुद्ध पंचांग प्रचारांत येण्याचा मुळींच संभव नाहीं, हें जाणून आम्ही हा ग्रंथ मराठी भाषेंत लिहिण्यास प्रवृत्त झालों आहों. याचा मुख्य हेतु आमच्या सुशिक्षित बांधवांना ज्योतिःशास्त्रासंबंधीं गणिताची उपपत्ति कळवावी व तद्द्वारा या शास्त्राची त्यांना गोडी लावावी हा आहे. हल्लीं मराठी भाषा बोलणारांची संख्या व व्याप्ति बरीच मोठी आहे. ठिकठिकाणीं ट्रेनिंग, इंजिनिअरिंग आणि आर्टस् कॉलेजें स्थापन झालीं आहेत. त्यांतून दरवर्षी शेंकडों विद्यार्थी शिकून बाहेर पडत आहेत. म्हणून या पुस्तकाला जिज्ञासु व बुद्धिमान् वाचक बरेच मिळतील अशी उमेद आहे.

**ग्रंथाची रचना.**

या पुस्तकाचे पद्धति आणि उपपत्ति असे दोन भाग केले आहेत. पहिल्या भागांत कोष्टकांवरून गणित करण्याची पद्धति सांगितली आहे. ती सहज ध्यानांत ठेवतां यावी यासाठीं शक्य असेल तेथें समीकरणरूप सूत्रांनीं व्यक्त केली आहे; आणि छोटीं उदाहरणें देऊन स्पष्ट केली आहे. मोठीं उदाहरणें थोडक्या जागेंत व्यवस्थितपणें कशीं मांडावीं तें त्यासांनीं दाखविलें आहे. ग्रहांचीं स्थानें दोन-तीन कलांच्या तफावतीनें वेधांशीं जुळलीं तर पुरें असें आम्हीं मानिलें आहे. म्हणून त्यांचे लहान लहान आकर्षण-संस्कार सोडून दिले आहेत. भोग व संस्कार प्राचीन संप्रदायाप्रमाणें राश्यंश कलात्मक न देतां दशांशपद्धतीनें अंशात्मक दिले आहेत. त्यामुळें जागा थोडी लागून गणितश्रमही वांचतात. उपपत्ति शक्य तितकी आकृति देऊन भूमितिपद्धतीनें व्यक्त केली आहे. असें करितांना व्याख्येय वस्तु व्याख्यानांतून स्पष्ट निराळ्या दिसाव्या म्हणून त्या इंग्रजी अक्षरांनीं दाखविल्या आहेत. भुजज्या, कोटिज्या, स्पर्शरेषा या लांब लांब शब्दांपासून त्रास होऊं नये म्हणून पाश्चात्य देशांत रूढ झालेल्या सांकेतिक चिन्हांचा आणि अक्षरांचा उपयोग केला आहे, आणि नवशिक्यांच्या अडचणींकडे लक्ष देऊन उपपादनांतील पायऱ्यांची संख्या बरीच वाढविली आहे. संस्कृतपारिभाषिक शब्दांचे इंग्रजी पर्यायशब्द जेथल्या तेथें कंसांत दाखविले आहेत. त्यावरून फ्रेंच व इंग्लिश भाषेंतील औपपत्तिक उद्ग्रंथ वाचण्यास मदत होईल. प्राचीन शब्दांच्या अभावीं जरूरप्रसंगीं इनांतर, अनुकलन, अभिसरण, इत्यादि नूतन शब्द कल्पिले आहेत आणि सिद्धान्त व इतर ग्रंथांतून विचारसाम्यदर्शक अवतरणेंही जागोजाग दिलीं आहेत.

**वाचकांस दोन शब्द.**

कोणताही विषय गुरुमुखाशिवाय केवळ स्वतःच्या प्रयत्नानें शिकणें जितकें कठीण आहे तितकेंच तें फायदेशीरही आहे. आगगाडीच्या प्रवासापेक्षां पायीं केलेला प्रवास तात्त्विकदृष्ट्या विशेष ज्ञानवर्धक होतो, म्हणून वाचकांनीं धीर सोडूं नये. पहिल्या वाचनाच्या वेळीं राहून गेलेल्या

अनुक्रमणिका

शंकांचें निरसन दुसऱ्या वाचनाच्या वेळीं होईल. पद्धति आणि उपपत्ति हे दोनहि भाग पाळीपाळीनें वाचीत गेल्यास परस्परांमधील कार्यकारणसंबंध विशद होत जाईल. हें पुस्तक वाचण्यापूर्वी आमचें आकाशाचे नकाशे हें पुस्तक वाचून आकाशांतील कल्पित वृत्तांची व मुख्य मुख्य ताऱ्यांची ओळख करून घेतली तर हें पुस्तक विशेष मनोरंजक वाटेल, आणि या पुस्तकाप्रमाणें वर्तविलेली ग्रहांची स्थिति आकाशामध्यें प्रत्यक्ष पाहून वाचकांना जो आनंद होईल तोच त्यांच्या श्रमाचें योग्य बक्षिस होय.

या पुस्तकाच्या अध्ययनापासून वाचकांस ज्योतिःविषयक यथार्थ ज्ञान व आनंद अंशतः जरी प्राप्त होईल तरी आमच्या श्रमाचा मोबदला आम्हांस मिळाला असें आम्ही मानूं. या पुस्तकाचा उपयोग कसा होतो, यांत गुण व दोष कोणकोणते आहेत, सुधारणा करण्याजोग्या गोष्टी कोणत्या, याविषयीं विद्वान् देशबांधव आपापले अभिप्राय मेहेरबानीनें आम्हांस कळवितील तर त्यांचा सादर स्वीकार व विचार केला जाईल हें वेगळें सांगण्यास नकोच.

हें पुस्तक लोकांच्या आदरास पात्र होईल अशी आम्हांस उमेद आहे आणि त्याप्रमाणें झालें म्हणजे या आरंभिलेल्या ज्योतिर्गणित पुस्तकावलींतील इतर पुस्तकें लिहिण्यास आम्हांस उत्साह वाटेल.

हें पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याच्या कामीं रा. रा. कृष्णाजी बल्लाळ देवल, पेन्शनर, डे. कलेक्टर, रा. रा. गणेश सखाराम खरे, पेन्शनर, असि. इंजिनिअर ; आणि रा. रा. नरहर वेंकटेश कोल्हटकर, बी. एस्सी., शिक्षक, ट्रेनिंग कॉलेज, धारवाड, यांनीं केलेल्या मदती-बद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानितों.

पुणें, ता. २८ सप्टेंबर १९१४.
शके १८३६, आश्विन शुक्ल १० सोमवार. } ग्रंथकर्ता.

अनुक्रमणिका

नूतन-ज्योतिर्गणित-सूत्रोपपत्ति-
भास्कर



कै. दत्तात्रेय वेंकटेश केतकर,
बी. ए., बी. टी.
मराठी ग्रहगणित द्वितीयावृत्तीचे संपादक

जन्म : १८९०] [मृत्यु : २०-११-१९६३

अनुक्रमणिका

# द्वितीयावृत्तीच्या संपादकाचें निवेदन

## वडिलांचा मनोदय

पॅरिस, लंडन येथील सुप्रसिद्ध महागणिती मॉनशियर बर्ग, ली व्हेरिअर, हानसेन वगैरे पाश्चात्य ज्योतिर्विदांप्रमाणेंच भारतांतही विस्तृत ग्रहकोष्टकें रचावीं असा आमचे वडिलांचा बेत होता व तशीं कोष्टकें रचणें त्यांना सहज शक्य होतें. पण ज्योतिषशास्त्राविषयीं असावी तितकी जागृति येथें झाली नसल्यानें व लवकर तशी जागृति होऊन या कामास लागणारें द्रव्यसाहाय्य कोणाकडूनहि मिळण्याचा संभव नसल्यानें त्यांनीं "ग्रहगणित" व "ज्योतिर्गणित" या दोन्ही ग्रंथांत अतिसंक्षिप्तरूपानेंच कोष्टकें सिद्ध केलीं. पण कालानुकूल्य लाभेल तेव्हां सर्व कोष्टकें समीकरण सूत्राधारें, गाणितिक युक्त्या उपयोगांत आणून, सर्वांग-परिपूर्ण असा ग्रंथ तयार करावा जेणेंकरून खगोलीय चमत्कारांच्या गणिताकरतां भरत-खंडाबाहेर कोठेंहि जावें लागणार नाहीं.

## नवीन उपपत्तिग्रंथ

आकृति व भरपूर विवरण यांनीं युक्त असा हा नवीन उपपत्तिग्रंथ सिद्ध झालाच पाहिजे असा माझा कटाक्ष आहे. जुन्या ज्योतिर्विदांच्या टीकांतहि विपुल उपपत्ति-विवेचन आहे, तेंहि जमेस धरावें म्हणजे केतकरांनीं उपपत्तीच्या बाबतींत कशी गणितबद्ध प्रगति केली आहे हें वाचकांना स्पष्ट समजेल. उच्च गणितांतील व आकर्षण शास्त्रांतील सिद्धान्त आजपर्यंत करणग्रंथांत कोणीहि आणलेले नाहींत. तो पहिला मान आम्हींच पटकाविला आहे. या नवीन उपक्रमामुळें आमचा उपपत्तिग्रंथहि पहिलाच होणार म्हणून उपपत्ति सुबोध व विस्तृत दिली जावी.

## वरील मनोदयाला अनुलक्षून माझें निवेदन

सुदैवानें आज मला कालानुकूल्य व द्रव्यानुकूल्य हीं दोन्हीं लाभण्याच्या मार्गावर आहेत. ज्योतिषजागृति दृग्गोचर होऊं लागली आहे. महाराष्ट्र राज्य सरकारनें भारत राष्ट्राच्या संपन्नतेला पोषक अशा उत्कृष्ट शास्त्रीय ग्रंथांना साहाय्य देऊन त्यांना आर्थिक कुचंबणेंतून मुक्त करण्याकरितां महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ निर्माण केलें आहे, ही अभिनंदनीय गोष्ट आहे. या मंडळाकडे मीं विनंतीअर्ज पाठविला. त्याप्रमाणें महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळानें माझ्या कार्याकरितां एक छोटेसें अनुदानहि अर्पण केलें आहे. म्हणून मीं वडिलांच्या मनोदयाचें कार्य हातीं घेतलें व हा मराठी ग्रहगणित-ग्रंथ सिद्ध केला, व त्याची मुद्रण-प्रत (प्रेस कॉपी) तयार केली. वरील मंडळानें मुद्रण खर्च दिल्यास हा ग्रंथ मुद्रितहि होईल.

वडिलांच्या इच्छेप्रमाणें सर्व वृत्तान्त लिहून "ज्योतिर्गणित" व "उपपत्तिग्रंथ" यांच्या-करितांहि "अनुदानाची" मागणी मंडळाच्या अध्यक्षांकडे पाठविली आहे.

A-1953—ii.

प्रस्तुत ग्रंथांत कोष्टकें सूक्ष्म रीतीनें पुष्कळच वाढविलीं आहेत. उदाहरणें भरपूर दिलीं आहेत. उदाहरणांतील संदर्भनिर्देशांच्यायोगें गणकाला कोठेंही अडचण येणार नाहीं, अशी सुव्यवस्था साधिली आहे. उदाहरणांची मांडणी सुबोध, सविवरण व विस्तृत केली आहे. जागजागीं आकृति विवरणांसह दिल्या आहेत. तसाच भारतीय सर्व गणकांना व अभ्यासू शिष्यांना हा ग्रंथ सहज पसंत पडेल अशी आशा आहे.

द. वें. केतकर,

द्वितीयावृत्तीचा संपादक.

आमचे वडील कै. दत्तात्रेय वेंकटेश केतकर यांनीं मराठी ग्रहगणिताच्या या ग्रंथाचें काम वयाच्या ७२-७३ व्या वर्षी पूर्ण केलें, व त्यांनीं आपला इहलोकचा वास २०-११-१९६३ रोजीं संपविला. त्यांच्या मृत्यूनंतर या ग्रंथाच्या प्रकाशनाचें काम होत आहे. ग्रंथाची मूळ कॉपी एकच होती. कांहीं किरकोळ चुका ज्या सहज दृष्टोत्पत्तीस पडल्या त्या दुरुस्त करून हा ग्रंथ जशाचा तसा छापला आहे. ती. वडिलांची कोष्टकें वाढवून ग्रंथ सुलभ करण्याची इच्छा आज पूर्ण झाली.

भा. द. केतकर.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



## रवि-कोष्टकें
### (अंशात्मक)

पृष्ठें

## पंचांग-प्रकरण



## बुध-कोष्टकें

पृष्ठे

## शुक्र-कोष्टकें



## मंगळ-कोष्टकें

## गुरु-कोष्टकें



## शनि-कोष्टकें

## वरुण-कोष्टकें

पृष्ठें

## इंद्र-कोष्टकें



## चंद्रग्रहण-गणित



## सूर्यग्रहण

## साहाय्य कोष्टकें

॥ श्री ॥

# उपोद्घात

## ज्योतिःशास्त्राची व्याप्ति

### विश्व

१. आपण काळोख्या रात्रीं उंच जागीं बसून आकाशाकडे पाहिलें तर काजव्याप्रमाणें चमकणारीं लहानमोठीं हजारों नक्षत्रें आकाशभर पसरलेलीं पाहून आपणांस मोठें कौतुक वाटतें व हें विश्वयंत्र कोणीं, कां व कसें केलें असे अनेक प्रश्न मनांत उभे राहतात.

२. अशा प्रश्नांनीं प्रेरित होऊन मोठमोठ्या विद्वानांनीं हजारों वर्षें सतत श्रम केल्यावर अलीकडे विश्वविस्ताराविषयीं खालीं लिहिलेली माहिती मिळाली आहे.

३. सूर्य हें एक नक्षत्र आहे. तें जवळ असल्यामुळें आम्हांस मोठें दिसतें; तथापि आम्हापासून त्याचें अंतर ९ कोटी मैलांपेक्षां कमी नाहीं. सूर्याला अत्यंत जवळचें नक्षत्र सूर्यापासून आमच्या अंतराच्या दोन लक्षपटींपेक्षां कमी अंतरावर नाहीं, म्हणजे तें सूर्यापासून १८०००००००००००० अठरा महापद्म[1] मैलांच्या पलीकडे आहे.

४. दुर्बिणींतून पाहिलें तर अशीं कोट्यावधि नक्षत्रें दृष्टीस पडतात आणि प्रत्येक नक्षत्र इतरांपासून इतकेंच दूर असेल तर हीं असंख्य नक्षत्रें ज्यांत मावलीं आहेत त्या विश्वाचा विस्तार केवढा असला पाहिजे व त्याचा नियंता कोठें व कसा असावा असे विचार मनांत येऊन आम्ही अगदीं भांबावून जातों.

५. हीं नक्षत्रें एकटीं नाहींत. सूर्याप्रमाणें त्यांच्याभोंवती फिरणारे ग्रह व उपग्रह आहेत. पण त्यांच्या जगड्व्याळ अंतरामुळें ते आम्हांस दिसत नाहींत. सध्या हीं कोट्यावधि नक्षत्रें व त्यांच्या ग्रहमाला यांविषयीं आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. आम्हांस फक्त आमच्या जवळचें नक्षत्र जो सूर्य त्याच्या परिस्थितीचा विचार करावयाचा आहे. या कामीं पूर्वोक्त नक्षत्रांचा आकाशावर फक्त अचल खुणांसारखा उपयोग होतो.

### ग्रहमाला

६. (आकृति १ पाहा). येथें बुधादि ८ मोठे ग्रह साधारणतः एकाच पातळींत पण निरनिराळ्या अंतरावर गोफणींतील धोंड्याप्रमाणें सूर्याभोंवतीं सतत फिरत आहेत. याशिवाय कांहीं धूमकेतु अत्यंत लांबट मार्गानें त्याच्याभोंवतीं फिरत आहेत. त्यांपैकीं हॅलेचा धूमकेतु नुकताच तीन वर्षांपूर्वीं (ता. १९ मे १९१०) आपलें भव्य व भयंकर स्वरूप प्रकट करून अगदीं आमच्या पृथ्वीला लागून गेला. त्यावेळीं त्याचें शेपूट आकाशामध्यें १०० अंशांपेक्षांहि

---

[1] ही संख्या रामायणांतील वानरसंख्येएवढी आहे.

जास्त लांब होतें. त्याची कक्षा शुक्रापासून इंद्र (नेपच्यून) कक्षाच्याहि पलीकडे गेली आहे. आपले मांडलिक ग्रह आपापलीं राज्यें कशीं चालवीत आहेत तें प्रत्यक्ष पाहून येऊन हकीकत निवेदन करण्यासाठींच कीं काय सूर्यानें ग्रहमालेंत त्याची नेमणूक केली आहे असें भासतें. म्हणून सर्व ग्रहांस समोरून गांठण्यासाठींच तो मुद्दाम उलट दिशेनें आपली फिरती करितो.

## ग्रहगणिताचा हेतु

७ पृथ्वी व इतर ग्रह सूर्याभोंवतीं फिरत आहेत व आपण पृथ्वीवर बसून सूर्याभोंवतीं फिरत आहों अशा स्थितींत आम्ही सूर्य, चंद्र व ग्रह यांजकडे इच्छिल्या वेळीं पाहिलें तर ते आकाशांत कोणत्या नक्षत्रापासून किती अंतरावर दिसतील तें पूर्वींच गणित करून सांगणें, हा या ग्रहगणिताचा मुख्य हेतु आहे.

## ग्रहगणित

८. स्वभावत: ग्रहगणिताचे दोन विभाग होतात: पहिला कालगणित आणि दुसरा स्थान (अवकाश) गणित. या प्रत्यकांत स्थिति आणि गति असे आणखी दोन दोन पोट-विभाग होतात.

## कालस्थिति

९. प्राचीन सांप्रदायास अनुसरून श्रीक्षेत्र **उज्जयिनीवरून** जाणाऱ्या याम्योत्तररेषेच्या संबंधानें पुढील गणित रचिलें आहे. शके १८०० बहुधान्य संवत्सरीं मिति चैत्र शुक्ल १ प्रतिपदा बुधवारीं **उज्जयिनीच्या** मध्यम सूर्योदयीं या ग्रहगणिताचा प्रारंभ (Epoch) मानला आहे. या वेळीं चक्र शून्य व अहर्गण शून्य अशी कालस्थिति होती.

१०. या वेळीं इ. स. १८७८ च्या एप्रिल महिन्याची ३ री तारीख होती व ज्यूलियन युगाचा गत अहर्गण २४०७०७७५४ होता.[१]

## ज्युलियन अहर्गण साधन

११. ज्यूलियन युगारंभ जानेवारी १, ख्रि. पू. ४७१३ यावेळीं होतो. आम्हांला एप्रिल ३, १८७८ बुधवार या दिवसापर्यंतचा अहर्गण काढावयाचा आहे. यर्थ खालील तत्त्व लक्षांत ठेवलें पाहिजे.

१२. (१) युगारंभीय वर्ष ख्रि. पू. आहे. तसेंच प्रश्नोक्त वर्षहि ख्रि. पूर्वच असलें तर वर्षगण सरळ निघतो. जसें सप्टेंबर १, ख्रि. पू. ११९३ या दिवसापर्यंतचा अहर्गण काढतांना—

ख्रि. पू. ४७१३

ख्रि. पू. –११९३

३५२० हा सरळ वर्षगण झाला.

---

[१] या युगाचा आरंभ इ. स. पूर्वी ४७१३ वर्षीं जानेवारीच्या १ तारखेस कल्पिला आहे. यांत ७९८० वर्षें आहेत. ही वर्षसंख्या २८, १९, १५ यांच्या गुणाकाराएवढी आहे. प्राचीन ऐतिहासिक कालाच्या व्यवस्थेसाठीं **जोसेफ स्कालीजर** यानें हें युग शोधून काढिलें.

A-1953—1-B.

अनुक्रमणिका

१३. (२) परंतु खि. पू. ४७१३ व खि. नंतर १८७८ अशा दोन पूर्वापार वर्षांतील वर्षगण काढतांना खि. पू. वर्षांत एक कमी करून घ्यावा लागतो. जसे—

मूळचें खि. पूर्व ४७१३ यांत एक कमी करून आलेलें :—

| | | |
|---|---|---|
| | ४७१२ | |
| खि. नंतर | +१८७८ | |
| | ६५९० | हा वर्षगण झाला. |

यांचे दिवस—

| | |
|---|---|
| ६५९० × ३६५ .. .. .. .. .. | २४०५३५० |
| (६५९० + ३) ÷ ४ लीप दिवस .. .. .. | + १६४८ |
| जानेवारी १ ते एप्रिल ३ पर्यंत दिवस .. .. .. | + ९२ |
| | २४०७०९० |
| न्यू स्टाईलचा संस्कार .. | — १२ |
| खि. पू. ४७१३, जानेवारी १ पासून खि. नंतर १८७८ एप्रिल ३ पर्यंत गताहर्गण. | २४०७०७८ |

## कालगति

(चक्रें आणि अहर्गण)

### दिलेल्या शक व तिथीवरून प्राचीन पद्धतीनें अहर्गण साधन

१४. रीति.—इच्छिलेल्या शालिवाहन शकाच्या वर्षांतून १८०० ही संख्या वजा करून बाकी राहिलेल्या वर्षास **वर्षगण** म्हणावें आणि वर्षगणास १९ नीं भागून आलेल्या भागाकारास चक्र व बाकीला **अवशिष्ट** वर्षें म्हणावें.

१५. **अवशिष्ट** वर्षास १२ नीं गुणून गुणाकारांत चैत्रादि गतमास मिळवून येतील ते **सौरमास** होतील.

१६. सौरमाससंख्या दोन जागीं मांडावी. पहिल्या जागीं मांडलेल्या सौरमाससंख्येंत १० मिळवून आलेल्या बेरजेला ३३ नीं भागावें. आलेला पूर्ण भागाकार **अधिकमास** होतात. हे अधिकमास दुसरीकडे मांडलेल्या सौरमासांत मिळवून येतील ते **चांद्रमास** होतात.

१७. चांद्रमासांस ३० नीं गुणून त्या गुणाकारांत चालू महिन्याच्या शुक्ल प्रतिपदेपासून गततिथि मिळवाव्या आणि बेरजेंतून वर्षगणास ६० नीं भागून येणाऱ्या पूर्ण तिथि वजा कराव्या म्हणजे बाकीइतका **तिथिगण** होतो.

१८. तिथिगणास ६४ नीं भागून येणारा पूर्ण भागाकार तिथिगणांतून वजा करून बाकी राहील ती संख्या **अहर्गण** होईल.

१९. **अहर्गणपरीक्षा.**—याप्रमाणें आलेल्या अहर्गणांत ४ आणि चक्राची तिप्पट मिळवून बेरजला ७ नीं भागावें. बाकी शून्य राहिल्यास शनिवार, एक राहिल्यास रविवार, दोन राहिल्यास सोमवार, तीन राहिल्यास मंगळवार असें मोजून, आलेल्या बाकीवरून **वार**

आणावा. हा वार दिलेल्या दिवसाच्या वाराशीं जमेल तर आलेला अहर्गण बरोबर आहे असें जाणावें. वार न जमेल तर तो जमण्यासाठीं अहर्गणांत १ मिळवावा किंवा वजा करावा म्हणजे खरा अहर्गण येईल.

२०. दोष :—अहर्गण गणितांत वाराचें प्राधान्य असल्यामुळें वार न देतां नुसती तिथि दिली असेल तर अहर्गण संदिग्ध असतो. इष्ट दिवसाची ग्रहस्थिति दिली असेल तर संदिग्ध अहर्गणावरून ग्रहस्थिति आणिल्यावर ती दिलेल्या ग्रहस्थितीशीं जमेल तरच त्याची संदिग्धता नाहींशी होते. म्हणून वाराशिवाय केवळ तिथीवरून काढलेला अहर्गण पंगु असतो.

### उदाहरण १ लें

२१. शके १८२८ पौष कृष्ण २ या बुधवारीं प्रातःकालीं अहर्गण किती होता तें सांगा ? (जानेवारी २, १९०७ इ. बुधवार).

| | | |
|---|---|---|
| अ इष्ट शकवर्ष .. .. .. .. .. | | १८२८ |
| ब उणा क्षेपक .. .. .. .. .. | — | १८०० |
| क वर्षगण .. .. .. .. .. | | २८ |
| ड २८ ÷ १९ = भागाकार १ गतचक्र ; बाकी .. .. | | ९ |
| | × | १२ |
| ई सौरमास ; चक्रारंभापासून इष्ट वर्षारंभापर्यंत .. .. | | १०८ |
| फ सौरमास ; वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत .. .. | + | ९ |
| एकंदर सौरमास .. .. ११७ } क्षपक मास .. .. १० } (एकूण १२७) .. .. | | ११७ |
| अधिकमास ३३ ) १२७ ( ३ .. .. | | ३ |
| चांद्रमास .. .. .. .. .. | | १२० |
| | × | ३० |
| गततिथि ; इष्ट मासारंभापर्यंत .. .. .. | | ३६०० |
| गततिथि ; इष्ट तिथि कृष्ण २ येथपर्यंत .. .. .. | + | १६ |
| चक्रारंभापासून इष्ट तिथीपर्यंत गततिथि .. .. | | ३६१६ |
| वर्षगण २८ ÷ ६० = .. .. .. .. | — | ० |
| ३६१६ ÷ ६४ = क्षयतिथि .. .. .. | — | ५६ |
| अहर्गण .. .. .. .. .. | | ३५६० |

अनुक्रमणिका

**अहर्गणपरीक्षा.**—चक्र १ याचा तिप्पट ३ यांत ४ मिळवून आलेली ७ ही संख्या अहर्गणांत मिळवून ३५६७ या बेरजेला ७ नीं भागून बाकी ४ राहतात. रविवार १ धरून मोजले तर ४ था वार बुधवार येतो. हा उदाहरणांत दिलेल्या वाराशीं जमतो म्हणून ३५६० हा अहर्गण बरोबर आहे.

प्यारा २१ मधील 'ड' ओळींत (१) एक गतचक्र व बाकी ९ वर्षें व (२) 'फ' ओळींत चैत्रापासून पौषापर्यंत ९ महिने दाखविले आहे. या १ चक्र, ९ वर्षें, ९ महिने अंकाचा उपयोग, नीचे, पात, अयनांश यांच्या साधनात केला आहे. कारण त्यांची गति फारच अल्प आहे.

२२. हें सर्वसामान्य अहर्गणाचें उदाहरण झालें. आतां यापुढें गणकांच्या भावी शंकांचा निरास करण्याकरितां चार विशिष्ट उदाहरणें देतों.

२३. शके १८१९ मध्यें १९ वर्षांचें चक्र पूर्ण होतें. त्या प्रसंगीं सिद्धान्तोक्तरीतीनें अहर्गण कसा साधावा त्याचें उदाहरण:—

### उदाहरण २ रें

शके १८१९ चैत्र शुद्ध प्रतिपदा, शनिवार प्रातःकालीं अहर्गण किती होता ?

| | | |
|---|---|---|
| इष्ट शकवर्ष | .. .. .. .. .. | १८१९ |
| उणे क्षेपकवर्ष १८०० | .. .. .. .. | — १८०० |
| | बाकी वर्षगण .. | १९ |
| वर्षगण | गतचक्र | |
| १९ ÷ १९ = | १ ; बाकी .. .. | ० |
| महिने करण्याकरितां | .. .. .. .. | × १२ |
| चक्रारंभापासून इष्ट वर्षारंभापर्यंत सौरमास | .. .. | ० |
| इष्ट वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत सौरमास | .. .. | + ० |
| | एकंदर सौरमास .. | ० |
| एकंदर सौरमास | .. | ० |
| अधिक क्षेपकमास | .. | + १० |
| | | १० |

१०, भागिले ÷ ३३
भागाकार फल ० .. .. .. .. + ०

चांद्रमास .. ०
यांच्या तिथि .. × ३०

०
गततिथि, इष्ट तिथीपर्यंत .. .. .. .. + ०

चक्रारंभापासून इष्ट तिथीपर्यंत गततिथि .. .. ०
वर्षगण १९ ÷ ६० = .. .. .. .. − ०
गततिथि ÷ ६४ = क्षयतिथि .. .. .. − ०

अहर्गण = ०

**फलश्रुति.**—शके १८१९ चैत्र शुद्ध प्रतिपदेपर्यंत १ चक्र व शून्य अहर्गण सिद्ध झाला.

**अहर्गणपरीक्षा.**—चक्र १ याची तिप्पट ३ यांत ४ मिळवून आलेली ७ ही संख्या वरील अहर्गण शून्य यांत मिळवून ७ या बेरजेला ७ नीं भागून बाकी शून्य राहते. शून्य म्हणजे शनिवार, हा उदाहरणांत दिलेल्या वाराशीं जमतो म्हणून १ चक्र व शून्य अहर्गण बरोबर आहे.

### उदाहरण ३ रें

२४. शके १८३८ चैत्र शुद्ध प्रतिपदा सोमवार या दिवशीं प्रातःकालीं अहर्गण किती ?

इष्ट शकवर्ष .. .. .. .. .. १८३८
उणे क्षेपकवर्ष .. .. .. .. .. − १८००

३८

बाकी वर्षगण ३८

वर्षगण ३८ ÷ १९ = २ गतचक्रें, बाकी .. .. ०
महिने करण्याकरितां .. .. .. .. × १२

०
चक्रारंभापासून इष्ट वर्षारंभापर्यंत सौरमास .. .. ०
इष्ट वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत सौरमास .. .. + ०

एकंदर सौरमास ०

अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| एकंदर सौरमास | .. .. .. .. | ० |
| अधिक क्षेपकमास | .. .. .. .. | + १० |
| | | १० |
| १०, भागिले ÷ ३३ भागाकार फल ० | .. .. .. .. | + ० |
| चांद्रमास] | .. | ० |
| | | × ३० |
| यांच्या तिथि | .. | ० |
| इष्ट तिथीपर्यंत गततिथि | .. | + ० |
| चक्रारंभापासून इष्ट तिथीपर्यंत गततिथि | .. .. | ० |
| वर्षगण ३८ ÷ ६० = | .. .. .. .. | ० |
| गततिथि ० ÷ ६४ क्षयतिथि | .. .. .. | — ० |
| अहर्गण | .. | ० |

यावरून, शके १८३८ चैत्र शुद्ध प्रतिपदेपर्यंत २ चक्रें व शून्य अहर्गण सिद्ध झाला. याची परीक्षा करूं.

**अहर्गणपरीक्षा.**—चक्रें २ यांची तिप्पट ६ यांत ४ मिळवून बेरीज १० ही वरील अहर्गणांत मिळवून १० या बेरजेला ७ नीं भागून बाकी ३ उरतात. एक म्हणजे रविवार धरून मंगळवार येतो. पण दिलेला वार सोमवार आहे म्हणून ० शून्य अहर्गणांत एक कमी करून इष्ट प्रात:कालीं १ चक्र व ६९३९ अहर्गण सिद्ध झाला.

## उदाहरण ४ थें

२५. शके १८५७ चैत्र शु॥ १ गुरुवार या दिवशीं प्रात:कालीं अहर्गण किती ?

| | | |
|---|---|---|
| इष्ट शकवर्ष | .. .. .. .. .. | १८५७ |
| उणे क्षेपकवर्ष | .. .. .. .. .. | १८०० |
| बाकी वर्षगण | .. | ५७ |
| वर्षगण ५७ ÷ १९ = ३ चक्रें बाकी | .. .. | ० |
| महिने करण्याकरितां | .. .. .. .. | × १२ |

अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| चक्रारंभापासून इष्ट वर्षारंभापर्यंत सौरमास .. .. | | ० |
| इष्ट वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत सौरमास .. .. | + | ० |
| एकंदर सौरमास .. | | ० |
| एकंदर सौरमास .. .. .. .. | | ० |
| अधिक क्षेपकमास .. .. .. .. | + | १० |
| | | १० |
| १०, मागिले ÷ ३३ | | |
| भागाकार ० .. .. .. .. | + | ० |
| चांद्रमास .. | | ० |
| यांच्या तिथि .. | × | ३० |
| | | ० |
| इष्टतिथीपर्यंत गततिथि .. .. .. .. | — | ० |
| चक्रारंभापासून इष्ट तिथीपर्यंत गततिथि .. .. | | ० |
| वर्षगण ५७ ÷ ६० = .. .. .. .. | | ० |
| गततिथि ० ÷ ६४ = क्षयतिथि .. .. .. | | ० |
| अहर्गण .. | | ० |

यावरून शके १८५७ चैत्र शु॥ प्रतिपदेपर्यंत तीन चक्रें व शून्य अहर्गण सिद्ध झाला.

**अहर्गणपरीक्षा.**—चक्रें ३ याची तिप्पट ९ यांत ४ मिळवून १३ ही बेरीज वरील० शून्य अहर्गणांत मिळवून आलेल्या एकंदर १३ बेरजेला ७ नें भागून बाकी ६ उरतात. एक म्हणजे रविवार या क्रमानें ६ म्हणजे शुक्रवार येतो. परंतु पंचांगांत गुरुवार दिला आहे. म्हणून ० शून्य अहर्गण १ उणें केला पाहिजे अर्थात् ३ चक्रें = २ च

| | | |
|---|---|---|
| | | अहर्गण |
| | | ६९४० |
| उणे | — | १ |
| २ चक्रें | | ६९३९ |

म्हणून २ चक्रे व ६९३९ हा अहर्गण सिद्ध झाला.

### उदाहरण ५ वें

२६. शके १८७६ चैत्र शु॥ १ रविवार या दिवशीं प्रात:काळीं अहर्गण किती ?

| | | |
|---|---|---|
| इष्ट शकवर्ष | .. .. .. .. .. | १८७६ |
| उणे क्षेपकवर्ष | .. .. .. .. .. | १८०० |
| | बाकी वर्षगण .. | ७६ |
| वर्षगण ७६ ÷ १९ = ४ चक्रें बाकी | .. .. | ० |
| महिने करण्याकरितां | .. .. .. .. | × १२ |
| चक्रारंभापासून इष्ट वर्षारंभापर्यंत सौरमास | .. .. | ० |
| इष्ट वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत सौरमास | .. .. | + ० |
| | एकंदर सौरमास .. | ० |
| एकंदर सौरमास | .. .. .. .. | ० |
| अधिक क्षेपकमास | .. .. .. .. | + १० |
| | | १० |
| १०, भागिले ÷ ३३ भागाकार | .. .. .. .. .. | + ० |
| | चांद्रमास .. | ० |
| | | × ३० |
| | यांच्या तिथि .. | ० |
| इष्ट तिथीपर्यंत गततिथि | .. .. .. .. | ० |
| चक्रारंभापासून इष्ट तिथीपर्यंत गततिथि | .. .. | ० |
| वर्षगण ७६ ÷ ६० = | .. .. .. .. | – १ |
| गततिथि ० ÷ ६४ = | .. .. .. .. | ० |
| | अहर्गण .. | – १ |

म्हणजे—३ चक्रें व अहर्गण ६९३९

अहर्गणपरीक्षा = चक्रें ३ × ३ = ९ + ४ = १३

म्हणून १३ + ६९३९ अहर्गण = ६९५२ ÷ ७ = १ बाकी

एक बाकी म्हणजे रविवार. वार जमला.

म्हणून ३ चक्रें व अहर्गण ६९३९ झाला.

आतां इंग्रजी नव्या पद्धतीच्या तारखेवरून अहर्गणानयन

## इंग्रजी तारखेवरून अहर्गण साधन

२७. **रीति.**—इच्छिलेल्या इ. स. वर्षांतून १८७८ वजा करून बाकी राहिलेल्या वर्षास वर्षगण म्हणावें. वर्षगणास ३६५ नीं गुणून गुणाकारांत वर्षारंभापासून इष्ट तारखेपर्यंत (लीप वर्ष असेल तर फेब्रुवारीचे २९ दिवस धरून) गेलेल्या तारखा मिळवून आलेल्या बेरजेंतून ९२ वजा करावे, म्हणजे सुमाराचा अखंडाहर्गण होतो. त्याला पुढील ३ संस्कार करावे.

(१) वर्षगणांत १ मिळवून बेरजेस ४ नीं भागून येणारा पूर्ण भागाकार पहिला संस्कार होतो. हा सर्वदा धन + असतो.

(२) वर्षगणांत ७७ मिळवून बेरजेस १०० नीं भागून येणारा पूर्ण भागाकार दुसरा संस्कार होतो. हा सर्वदा ऋण — समजावा.

(३) वर्षगणांत २७७ मिळवून बेरजेस ४०० नीं भागून येणारा पूर्ण भागाकार तिसरा संस्कार होतो. हा सर्वदा धन + असतो.

नंतर हे तीनही संस्कार अखंडाहर्गणास करून येईल त्याला ६९४० नीं भागावें. जो पूर्ण भागाकार येईल तीं **गतचक्रें** व जी बाकी राहील ती **अहर्गण** असें जाणावें.

**टीप.**—या रीतींत अधिकमास व क्षयतिथि यांची भानगड नसते म्हणून वार दिला नसला तरी काम चालतें.

### उदाहरण ६ वें

इ. स. १९०७ च्या जानेवारीच्या २ र्‍या तारखेस प्रात:कालीन गत अहर्गण किती होता तें सांगा ? (मागील उदा. १ लें पाहा.)

| | | |
|---|---|---|
| १९०७ | | दिवस |
| —१८७८ | | |
| २९ वर्षगण × ३६५ = .. .. .. | | १०५८५ |
| वर्षारंभापासून गतदिवस .. .. .. .. | + | १ |
| क्षेपक .. .. .. .. .. | — | ९२ |
| (२९ + १) ÷ ४ = पूर्ण भागाकार .. .. | + | ७ |
| (२९ + ७७) ÷ १०० = ,, .. .. | — | १ |
| (२९ + २७७) ÷ ४०० = ,, .. .. | + | ० |
| | | १०५०० |
| १०५०० ÷ ६९४० = १ चक्र, बाकी अहर्गण .. | | ३५६० |

अनुक्रमणिका

## उदाहरण ७ वें

इ. स. २००४ माहे जून तारीख ७ वी सोमवारीं रविशुक्राची मेदयुति होईल. म्हणजे शुक्र सूर्याच्या बिंबावर एका काळ्या ठिपक्याप्रमाणें दिसेल. त्या चमत्काराचें गणित करण्याचें आहे. तर त्या दिवशीं गतचक्र व अहर्गण हीं किती असतील तें काढा ?

| | | | दिवस |
|---|---|---|---|
| २००४ | | | |
| —१८७८ | | | |
| १२६ वर्षगण × ३६५ = | .. .. .. | | ४५९९० |
| वर्षारंभापासून गतदिवस (चालू वर्ष लिप आहे म्हणून) | .. | + | १५८ |
| क्षेपक | .. .. .. .. .. | — | ९२ |
| (१२६+१)÷४ = पूर्ण भागाकार | .. .. | + | ३१ |
| (१२६+७७)÷१०० = ,, | .. .. | — | २ |
| (१२६+२७७)÷४०० = ,, | .. .. | + | १ |
| | | | ४६०८६ |
| ४६०८६ ÷ ६९४० = चक्रें ६, बाकी अहर्गण | .. .. | | ४४४६ |

## उदाहरण ८ वें

इ. स. १८९७ एप्रिल ३, शनिवार या दिवशीं प्रातःकाळीं अहर्गण किती ?

| | | | दिवस |
|---|---|---|---|
| १८९७ | | | |
| —१८७८ | | | |
| १९ वर्षगण × ३६५ | .. .. .. .. | | ६९३५ |
| वर्षारंभापासून गतदिवस | .. .. .. .. | + | ९२ |
| क्षेपक | .. .. .. .. .. | — | ९२ |
| (१९+१)÷४ = पूर्ण भागाकार | .. .. | + | ५ |
| (१९+७७)÷१०० = ,, | .. .. .. | — | ० |
| (१९+२७७)÷४०० = ,, | .. .. .. | + | ० |
| अहर्गण | .. | | ६९४० |

म्हणजे एक पूर्ण चक्र व अहर्गण शून्य.

मागील उदा. २ रें यांतील उत्तराशीं याचा पूर्ण मेळ आहे.

## उदाहरण ९ वें

इ. स. १९१६ एप्रिल ७, सोमवार रोजीं प्रातःकाळीं अहर्गण किती ?

१९१६
—१८७८

| | | दिवस |
|---|---|---|
| ३८ वर्षगण × ३६५ | .. .. .. | १३८७० |
| वर्षारंभापासून गतदिवस | .. .. .. .. | + ९६ |
| क्षेपक दिवस | .. .. .. .. .. | — ९२ |
| (३८+१)÷४ | = पूर्ण भागाकार .. .. | + ९ |
| (३८+७७)÷१०० = | ,, .. .. | — १ |
| (३८+२७७)÷४०० = | ,, .. .. | + ० |
| | अहर्गण .. | १३८७९ |

म्हणजे १ चक्र व ६९३९ अहर्गण (मागील उदा. ३ पाहा).

## उदाहरण १० वें

मागील उदा. ४ थें यांतील शके १८५७ म्हणजे इ. स. १९३५ एप्रिल ४, गुरुवार दिवशीं प्रातःकाळीं अहर्गण किती ?

१९३५
—१८७८

| | | दिवस |
|---|---|---|
| ५७ × ३६५ | .. .. .. .. | २०८०५ |
| वर्षारंभापासून गतदिवस | .. .. .. .. | + ९३ |
| | | २०८९८ |
| क्षेपक | .. .. .. .. .. | — ९२ |
| | | २०८०६ |
| (५७+१)÷४ | = पूर्ण भागाकार .. .. | + १४ |
| | | २०८२० |
| (५७+७७)÷१०० = | ,, .. .. | — १ |
| | | २०८१९ |
| (५७+७७)÷४०० = | ,, .. .. | + ० |
| | अहर्गण .. | २०८१९ |

याचा अर्थ २ चक्रें व ६९३९ हा अहर्गण झाला.

अनुक्रमणिका

### उदाहरण ११ वें

मागील उदा. ५ वें यांतील शके १८७६ म्हणजे इ. स. १९५४ एप्रिल ४, रविवार या दिवशीं प्रातःकाळीं अहर्गण किती ?

| | दिवस |
|---|---|
| १९५४ | |
| —१८७८ | |
| ७६ × ३६५ .. .. .. .. | २७७४० |
| वर्षारंभापासून गतदिवस .. .. .. .. | +९३ |
| | २७८३३ |
| क्षेपक .. .. .. .. .. | —९२ |
| | २७७४१ |
| (७६+१)÷४=पूर्ण भागाकार .. .. .. | +१९ |
| | २७७६० |
| (७६+७७)÷१००= „ .. .. .. | —१ |
| | २७७५९ |
| (७६+२७७)÷४००= „ .. .. .. | +० |
| अहर्गण .. | २७७५९ |

म्हणजे ३ चक्रें व अहर्गण ६९३९ झाला.

### उदाहरण १२ वें (गेल्या वर्षाचें)

शके १८८३ आश्विन कृष्णपक्ष ५ मी शनिवार रोजीं प्रातःकाळीं अहर्गण किती ?

| | |
|---|---|
| इष्ट शकवर्ष .. .. .. .. .. | १८८३ |
| क्षेपकवर्ष .. .. .. .. .. — | १८०० |
| वर्षगण .. | ८३ |
| वर्ष ८३÷१९= ४ गतचक्रें बाकी ७ वर्षे .. | ७ |
| महिने करण्याकरितां .. .. .. .. × | १२ |
| चक्रारंभापासून इष्ट वर्षारंभापर्यंत सौरमास | ८४ |
| इष्ट वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत .. .. + | ६ |
| एकंदर सौरमास .. | ९० |

अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| एकंदर सौरमास .. | =९० .. .. | ९० |
| क्षेपकमास .. | +१० .. .. | |
| | १०० | |
| १००÷३३=३ अधिकमास | .. .. .. | +३ |
| | | ९३ |
| | | ×३० |
| इष्ट मासारंभापर्यंत गततिथि | .. .. .. | २७९० |
| कृष्ण ५ मी पर्यंत गततिथि | .. .. .. | +१९ |
| चक्रारंभापासून इष्ट तिथीपर्यंत गततिथि | .. .. | २८०९ |
| वर्षगण ८३÷६० | .. .. .. .. | —१ |
| तिथि २८०९÷६४ | .. .. .. .. | —४४ |
| | अहर्गण .. | २७६४ |

परीक्षा करूं.—चक्रें ४×३=१२+४=१६+२७६४=२७८० याला भागिलें ७, बाकी एक म्हणजे रविवार. पण दिलेला वार शनिवार आहे म्हणून अहर्गण एकाने कमी करून २७६३ व चक्रें ४ झालीं.

### उदाहरण १३ वें

इ. स. १९६१ ऑक्टोबर २८, शनिवार या दिवशीं प्रातःकाळीं अहर्गण किती ?

| | | |
|---|---|---|
| १९६१ | | दिवस |
| —१८७८ | | |
| ८३ × ३६५ | .. .. .. .. | ३०२९५ |
| वर्षारंभापासून गत दिवस | .. .. .. .. | +३०० |
| | | ३०५९५ |
| क्षेपक | .. .. .. .. .. | —९२ |
| | | ३०५०३ |
| (८३+१)=८४÷४= पूर्ण भागाकार | .. .. | +२१ |
| | | ३०५२४ |
| (८३+७७)=१६०÷१००= „ | .. .. | —१ |
| | | ३०५२३ |
| (८३+२७७)=३६०÷४००= „ | .. .. | —० |
| | अहर्गण .. | ३०५२३ |

एक चक्र म्हणजे ६९४० दिवस. या हिशोबानें अहर्गण ३०५२३ यांत ४ चक्रें व २७६३ दिवस बसतात.

चक्रें ४ यांची तिप्पट १२ अधिक ४ बरोबर १६ हें वरील २७६३ मध्ये मिळवून २७७९. मग सातांनीं भागिले असतां बाकी शून्य म्हणजे शनिवार येतो व हा वार उदाहरणांत दिलेल्या वाराशीं जमतो म्हणून अहर्गण बरोबर आहे.

मागील १२ व्या उदाहरणांतही एकानें कमी करून आलेला अहर्गण ४ चक्रें व २७६३ दिवस इतकाच आहे.

## प्रागहर्गणगणित

२८. इष्ट दिवस शके १८०० च्या पूर्वी असेल तर अहर्गण आणण्याच्या रीतींत थोडा फेरफार करावा लागतो तो असा. शके १८०० यांतून इष्ट शकवर्ष वजा करून बाकीला वर्षगण म्हणावें.

चैत्रादि गतमास व गततिथि मिळविण्याऐवजीं वजा कराव्या.

अधिकमासासाठीं मिळविण्याचा क्षेपक १० ऐवजीं १८ घ्यावा.

**मागील अहर्गणाची परीक्षा.**—अहर्गणांत ३ आणि चक्राची तिप्पट मिळवून बेरजेस ७ नीं भागून आलेली बाकी ७ तून वजा करून बाकी एक राहील तर रविवार, दोन राहतील तर सोमवार असें समजावें.

### उदाहरण १४ वें

शके १४४२ चैत्र शुक्ल १ प्रतिपदा सोमवारीं प्रातःकाळीं गत अहर्गण किती तें सांगा. हा ग्रहलाघवीय गणिताचा प्रारंभकाल आहे.

| | |
|---|---|
| क्षेपक .. .. .. .. .. | १८०० |
| इष्टवर्ष .. .. .. .. .. | — १४४२ |
| वर्षगण .. .. .. .. .. | ३५८ |
| ३५८ ÷ १९ = भागाकार गतचक्रें १८, शेष वर्ष .. | १६ |
| | × १२ |
| सौरमास, चक्रारंभापासून .. .. .. .. | १९२ |
| गतमास वजा .. .. .. .. .. | — ० |

अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| एकूण सौरमास | .. १९२ } | १९२ |
| क्षेपक | .. .. १८ | |
| अधिकमास | ३३ ) २१० ( ६ | ६ |
| चांद्रमास | .. .. .. .. .. | १९८ |
| | | ×३० |
| गततिथि इष्ट मासारंभापर्यंत | .. .. .. | ५९४० |
| गततिथि इष्ट मासाच्या वजा | .. .. .. | ० |
| वर्षगण ३५८ ÷ ६० = ६ | .. .. .. | —६ |
| | | ५९३४ |
| ५९३४ ÷ ६४ = ९२ क्षयतिथि | .. .. .. | —९२ |
| प्रागहर्गण | .. .. .. .. .. | ५८४२ |

अहर्गण ५८४२ + ३ + ५४ = ५८९९ ÷ ७ = बाकी राहिले ५ हे ७ यांतून वजा करून बाकी राहिले २ म्हणून इष्ट दिवशीं सोमवार आहे.

## अधिकमास

(कोष्टक १५२ व १५३)

२९. शके १८००—२२०० पर्यंत येणारे अधिकमास, क्षयमास व त्यांचीं वर्षें हीं दिलीं आहेत. या अवधींत इष्ट वर्ष असेल तर त्या वर्षी अधिकमास आहे किंवा नाहीं तें कोष्टक पाहिल्यानें समजतें. हे अधिकमास सूर्य-चंद्राच्या स्पष्ट स्थितीवरून ठरविले आहेत. मध्यममानानें दर ३३ महिन्यांनीं एक अधिकमास पडतो. पण स्पष्टमानानें एक अधिकमास पडण्यास कधीं ३५ तर कधीं २८ च महिने लागतात, असें सदर कोष्टकावरून दिसून येईल. म्हणून मध्यम मानानें ज्या महिन्यांत अधिक पडावा त्या महिन्याच्या पुढें किंवा मागें कधीं कधीं २–४ महिन्यांनीं स्पष्ट अधिकमास पडतो. म्हणून सौरमासास ३३ नीं भागून अधिकमास आणते-वेळीं बाकी १-२ इत्यादि राहतील तर मध्यममानाचा अधिकमास उत्पन्न झालेला असतो. पण कोष्टकांतील अधिकमास पुढें पडणारा असेल तर तो पडेपर्यंत अधिकमाससंख्येंत एक कमी करून येतील ते अधिकमास मानावे. तसेंच बाकी २८, २९ इत्यादि येईल तर मध्यम-मानाचा अधिकमास होण्यास ४-५ महिने कमी असतात. पण अशा प्रसंगीं कोष्टकांतील अधिक महिना पूर्वींच पडला असेल तर मागून येणाऱ्या अधिकमाससंख्येंत १ अधिक करून येतील ते अधिकमास समजावे. सारांश, अधिकमास आणण्याचे कामीं गणकांनीं आपल्या तारतम्य ज्ञानाचा उपयोग केला पाहिजे. म्हणून भास्कराचार्य म्हणतात :—

स्पष्टोऽधिमासः पतितोऽप्यलब्धो
यदा यदा वाऽपतितोऽपि लब्धः ।
सैकैर्निरेकैः क्रमशोऽधिमासै-
स्तदा दिनौघः सुधिया प्रसाध्यः ॥

३०. कोष्टक १५२ व कोष्टक १५३ यांची रचना करून येथें ती दोनहि कोष्टकें जोडिलीं आहेत. कोष्टक १५२ मध्यें अधिकमास ठरविण्याची रीति, किंवा ठरविलेले असून संशय वाटल्यास त्याचें परीक्षण करून संशयनिरासाची रीति देऊन परीक्षा कशी करावी याचें एक उदाहरणहि दाखल केलें आहे. तें गणकांना मार्गदर्शन करील.

३१. कोष्टक १५३ यांत, प्रत्यक्ष १८००—२२०० शकापर्यंतचे अधिकमास सिद्ध करून दिले आहेत. त्यांचा गणकांना पुढें चांगलाच उपयोग होईल.

## उदाहरण १५ वें

शके १८२३ च्या आश्विन शु।। १० चा अहर्गण आणण्याचा आहे. येथें वर्षगण २३ यास १९ नीं भागून बाकी शेष वर्षें ४ राहतात यांचे सौरमास ४८ चैत्रादि गतमास ६ आणि क्षेपक १० मिळून एकूण सौरमास ६४ होतात. यास ३३ नीं भागून भागाकार १ हा मध्यम मानाचा अधिकमास झाला. येथें बाकी ३१ राहते म्हणून आणखी दोन महिन्यांनीं मध्यम मानाचा दुसरा अधिकमास उत्पन्न होणार. पण कोष्टक १५३ पाहिलें तर त्यांत आश्विना-पूर्वीच श्रवणमास अधिक पडला आहे. म्हणून मध्यममानाच्या अधिकमास संख्येंत १ मिळवून २ अधिकमास मानावे. म्हणून ४८+२=५० हे चांद्रमास झाले.

**टीप**:—या पुस्तकांत अधिकमास आणण्यासाठीं क्षेपक १० सौरमास धरिले असल्यामुळें ३३ नीं भागून येणाऱ्या अधिकमासांत १ कमी करण्याचा प्रसंग कधींहि येत नाहीं. आमचें आरंभ वर्ष १८१० वें असतें तर क्षेपक शून्य होऊन सैकनिरेक या दोनहि कृतींना अवकाश मिळाला असता.

आतां पुढें रविसाधनाचें प्रकरण खुलासेवार दिलें आहे.



अनुक्रमणिका

## रविसाधनाचें उदाहरण

३२. जानेवारी २, इ. स. १९०७, बुधवार (किंवा शके १८२८, पौष कृष्ण २, बुधवार) या दिवशींचें रविसाधन करूं. उदाहरण १ लें यांत —

(१) (मागील उदा. १ किंवा उदा. ६ यांत) एक चक्र व अहर्गण ३५६० आलेला आहे.

(२) अवशिष्ट वर्षगण ९ आला आहे. (पाहा, उदा. १ लें ४ थी पंक्ति.)

(३) वर्षारंभापासून इष्ट मासापर्यंत ९ महिने झाले आहेत.

(४) दिनांश २७ घटी, १४ पळें दिलेला आहे.

३३. **मध्यम रविसाधन** — को. १ (अ) क्षेपक ३४९°·०८७°; व चक्र १ यांतील गति ०°·१२७३ ; दिवस ३००० यांची गति — ७६°·८२७६ ; दिवस ५०० यांतील गति — १२२°·८०४६ ; दिवस ६० यांतील गति — ५९°·१३६५ ; (को. ३) घटिका २७ गति — ·४४३५ ; पळे १४ गति — ·००४१ ; या सर्वांची बेरीज ६१८°·४३०६ ; ३६०° वजा करून २५८°·४३०६ हा इष्ट क्षणींचा मध्यम रवि झाला.

३४. **रवि नीचसाधन** — को. ४ (अ) क्षेपक २५८°·६८३०; (ब) एकचक्रगति — ०°·०६२३ ; (क) अवशिष्ट वर्ष ९ यांतील नीच गति — ०°·०२९५ ; (ड) मास ९ तील गति — ०°·००२४ ; इष्ट क्षणीं रवि नीच = २५८°·७७७२.

३५. **रवि मध्यम केन्द्र साधन** —

| | | |
|---|---|---|
| मध्यम रवि | ‥ ‥ | ६१८°·४३०६ |
| उणें रवि नीच | ‥ | —२५८°·७७७२ |
| मध्यम केन्द्र | ‥ ‥ | ३५९·६५३४ |

३६. **अयनांशसाधन** — अयनांश क्षेपक को. ५ (अ) २२°·१४२५ ; (ब) एकचक्र-गति — ०°·२६५० ; (क) वर्षे ९ गति — ०°·१२५६ ; (ड) मास ९ गति — ०°·०१०३ ; इष्ट वेळी अयनांश — या सर्वांची बेरीज २२°·५४३४ अंश, अयनांश झाले.

३७. या अयनांशांना न्युटेशन नांवाचा संपात संस्कार केला म्हणजे अयनांश स्पष्ट संपातापासूनचे होतात. पिताजींनीं तो संस्कार सोडला होता. या आवृत्तींत आम्हीं त्याचा अन्तर्भाव केला आहे. (पाहा, कोष्टक ६.)

३८. **न्युटेशन** — पाहा, को. ६. चंद्रगणितंप्यारा, इष्ट कालीं चक्रशुद्ध राहु २५८·८ अंश यतो. त्यावरून मूळ राहु ३६० — २५८·८ = १०१°·२ व त्यांत अयनांश २२·५ अंश मिळवून आलेला सायन राहु १२३·७ अंश होतो. हें को. ६ चें उपकरण सिद्ध झालें.

३९. या १२३·७ उपकरणानें कोष्टक ६ वरून — १४″ (उणे चौदा विकलात्मक) असें फल येतें किंवा त्याच कोष्टकावरून — ·००३९ इतकें अंशात्मक फल येतें. याचा संस्कार अयनांशांना केला म्हणजे स्पष्ट अयनांश येतात. पुढील उदाहरणावरून पूर्ण खुलासा होईल.

४०. अयनांशसाधन यावरील प्यारिग्राफांत शेवटी २२·५४३४ अयनांश आलेले आहेत.

| | | |
|---|---|---|
| को. ५ वरून अयनांश | .. .. | २२°·५४३४ |
| को. ६ वरून न्युटेशन उणें—अंशात्मक | | — ·००३९ |
| हे स्फुट अयनांश | .. | २२·५३९५ २२°/३२′/२२″ |

४१. **मंदफलसाधन**—वरील मध्यम केंद्राच्या (३५९·६५३४) साहाय्यानें रविमंदफल कोष्टकावरून (को. ७) आलेलें फल ०°·०११९ हें तुलादि केंद्रांत असल्यानें ऋण म्हणजे —·०११९ असें येतें. याचा संस्कार मध्यम रवीला करावयाचा तो असा—

| | | |
|---|---|---|
| मध्यम रवि | .. .. .. | २५८°·४३०६ |
| मंदफल उणें | .. .. | — ·०११९ |
| निरयन स्पष्ट रवि | .. .. | २५८·४१८७ अंश |

४२. याप्रमाणें २५८·४१८७ अंश स्पष्ट रवि आला. आतां याची फ्रेंच गणितागत रवीशीं तुलना करूं.

## फ्रेंच पंचांग व ग्रहगणितावरून रवीची तुलना

मराठी ग्रहगणितागत रवीची पाश्चिमात्य पंचांगोक्त रवीशीं तुलना करावयाची असेल तर या आमच्या रवीला अयनांश संस्कार दिला पाहिजे. कारण पाश्चिमात्य पंचांगोक्त सर्व ग्रहस्थानें सायन असतात व आमचे ग्रह भारतीय परंपरेप्रमाणें निरयण असतात.

४३. आमचे अयनांश मध्यम संपातापासून यतात, म्हणून ते स्पष्ट संपातापासूनचे करण्याकरितां न्युटेशन संज्ञक संपात संस्कार करावा लागतो व शेवटीं दृश्य रविसाधनाकरितां अब्बीरेशन संज्ञक (किरणपुरस्सरण संस्कार) केला म्हणजे तो सायन स्पष्ट रवि वेधतुल्य होतो.

४४. आंग्ल पंचांगांत जानेवारी १ पर्यंतचा सायन रवि देऊन पुढें दैनिक अयनांश वृद्धि निराळ्या कॉलममध्यें सचिन्ह दिली असते. तिचा संस्कार एक जानेवारीच्या रवीला केला म्हणजे तो इष्ट वेळेचा सायन रवि होतो. नंतर संपात संस्कार व किरणपुरस्सरण हे दोन संस्कार चिन्हाप्रमाणे दिले असतां तो रवि वेधतुल्य होतो.

## तुलनेचें उदाहरण

| | मराठी ग्रहगणित | | फ्रेंच पंचांग |
|---|---|---|---|
| निरयण स्पष्ट रवि .. .. | २५८°·४१८७ | | |
| जानेवारी २ इ. स. १९०७ पर्यंतचे मध्यम अयनांश .. .. | +२२°·५४३४ | | |
| इष्ट दिनापर्यंतचा सायन स्पष्ट रवि .. | २८०°·९६२१ | अयनांश | २८०°·९६०८ |
| | | जानेवारी २ | +·०००१ |
| न्युटेशन | | | २८०°·९६०९ |
| या वेळीं राहु सायन १२३°·७ उपकरण स्वल्पांतरात्—१२४° अंश उपकरण | —·००३९ | | —·००३९ |
| | २८०°·९५८२ | | २८०°·९५७० |
| किरणपुर:स्थिर २० विकला उणें | —·००५५ | | —·००५५ |
| | २८०°·९५२७ | | २८०°·९५१५ |

| | | | |
|---|---|---|---|
| मराठी ग्रहगणित | २८०°-५७-९ | म. ग्र. | २८०°·९५२७ |
| फ्रेंच गणित .. | २८०°-५७-५ | | २८०°·९५१५ |
| अंतर .. | ०-०-४ | | ·००१२ |

गणित करण्याची पद्धत पुढें सोदाहरण दिली आहे :—

## रविगणना पद्धति

४५. **गणनापद्धति—**

मागील अहर्गणसाधनांत—

(१) एक चक्र व अहर्गण ३५६० आलेला आहे.

(२) तसेंच अवशिष्ट वर्षगण ९ आला आहे.

(३) वर्षारंभापासून इष्ट मासारंभापर्यंत ९ महिने आले आहेत.

(४) दिनांश २७ घटी १४ पळें, किंवा १० तास ५४ मिनिटें आहेत.

(१) यांतील उपकरणांनीं खालीं मध्यम रविसाधन, (२ व ३) वरून खालीं रविनीच-साधन व अयनांश साधन केलें आहे तें पाहा —

**इष्ट क्षणीं मध्यम रवि अंश**

| | | |
|---|---|---|
| को. १ (अ) क्षेपक | .. | ३४९·०८७० |
| (ब) चक्र १ | .. | ·१२७३ |
| (क) दि. ३००० | | ७६·८२७६ |
| ,, ५०० | .. | १३२·८०४६ |
| दि. ६० | .. | ५९·१३६५ |
| को. ६, घ. २७ | .. | ·४४३५ |
| प. १४ | .. | ·००३८ |
| | | ६१८·४३०६ |
| | | —३६० |
| मध्यम रवि | .. | २५८·४३०६ |

**रवि मध्यम केन्द्र साधन**

| | | |
|---|---|---|
| | | ६१८ |
| म. र. | .. | २५८·४३०६ |
| र. नी. उणें | .. | २५८·७७७२ |
| केन्द्र | | ३५९·६५३४ |

**रवि नीच अंश**

| | | |
|---|---|---|
| को. ४ (अ) क्षेपक | .. | २५८·६८३० |
| (ब) चक्र १ | .. | ·०६२३ |
| (क) वर्षे ९ | .. | ·०२९५ |
| (ड) मास ९ | .. | ·००२४ |
| इष्ट क्षणीं रवि नीच | .. | २५८·७७७२ |

**अयनांश**

| | | |
|---|---|---|
| को. ५ (अ) क्षेपक | .. | २२·१४२५ |
| (ब) चक्र १ | .. | ·२६५० |
| (क) वर्षे ९ | .. | ·१२५६ |
| (ड) मास ९ | .. | ·०१०३ |
| इष्ट वेळीं अयनांश | .. | २२·५४३४ |

**स्फुट अयनांश**

| | अयनांश |
|---|---|
| को. ५ वरून आणलेले मध्यम अयनांश .. .. .. | २२·५४३४ |
| को. ६ वरून आलेले न्युटेशन संस्कार .. .. .. | — ००·००३९ |
| स्पष्ट अयनांश .. | २२·५३९५ |

| | |
|---|---|
| मार्गे आणलेला मध्यम रवि .. .. .. .. | २५८·४३०६ |
| को. ७ वरून मंदफल ऋण .. .. .. .. | — ·०११९ |
| निरयन स्पष्ट रवि .. | २५८·४१८७ |

| स्फुट अयनांश | | अयनांश |
|---|---|---|
| निरयन स्पष्ट रवि | .. .. .. .. .. | २५८°·४१८७ |
| + स्पष्ट अयनांश | .. .. .. .. .. | + २२°·५३९५ |
| सायन स्पष्ट रवि (अ) | .. | २८०°·९५८२ |

किरणपुरस्सरण संस्कार —

| | | |
|---|---|---|
| स्थिर कल्पिलेला २० विकलात्मक ऋण (ब) | .. .. | ·००५५ |
| अ — ब म्हणून (अ — ब) | .. | २८०°·९५२७ |

याप्रमाणें (अ—ब) हा मराठी ग्रहगणिताधारें सायन स्पष्ट रवि सिद्ध झाला. याची तुलना—

| | | | |
|---|---|---|---|
| मराठी ग्रहगणित | .. .. .. | २८०°·९५२७ | २८०°,५७,१० |
| फ्रेंच गणित | .. .. .. | २८०°·९५१५ | २८०°,५७, ५ |
| | | ०००·००१२ | ० ० ५ |

अंतर ५ विकला आले.

## रवीचे उदय व अस्त

४६. रवीचे उदय व अस्त (को. ८, ९ व १० वे)—

उदाहरण—ता. २ जानेवारी १९०७ या दिवशीं पॅरीस येथील उदयास्त आमच्या मराठी ग्रहगणिताधारें काढूं :—

### सूत्रें

| | | ता. मि. |
|---|---|---|
| (१) उदय | .. | २४—२ + व्यस्तचर + उदयांतर. |
| (२) अस्त | .. | १२+२ + चर + उदयांतर. |

सायन रवि २८१ अंश. कोष्टक ८ वें वरून २८१ अंश उपकरणानें दक्षिण २३ अंश क्रांति आली. पॅरीसचे अक्षांश ४८° ५०′ उत्तर एवढें ज्ञात आहे. यावरून चर संस्कार काढूं. त्याचें सूत्र—

tan क्रांत्यंश × tan अक्षांश = चरज्या.

किंवा

स्पर्शज्या क्रांत्यंश — स्पर्शज्या अक्षांश = चरज्या.

या सूत्राधारें चरज्या साधन —

| | | |
|---|---|---|
| (अ) क्रांत्यंश स्पर्शज्या २३ | = | ·४२४५ |
| (ब) अक्षांश स्पर्शज्या ४८°,५०′ | = | १·१४३६ |
| (अ) × (ब) | = | ·४८५४ |
| याची भुजज्या .. | = | २९° |
| या अंशांचीं मिनिटें .. | = | ११५ |
| तास मिनिटें | = | १ ता. ५५ मि. |
| म्हणून चर संस्कार | = | १ ता. ५५ मि. आला. |

कोष्टक ९ तून उदयांतर संस्कार सिद्ध होतो.

**उदय (पॅरीस)**

सूत्र १ लें.—

| ता. | मि. | |
|---|---|---|
| २४ | ० | |
| — | २ | मि. किरणपुरस्सरण |
| २३ | ५८ | |
| + १ | ५५ | चर संस्कार |
| २५ | ५३ | |
| + | ४ | उदयांतर को. ९ |
| २५ | ५७ | |

| | ता. | मि. |
|---|---|---|
| मराठी ग्रहगणितावरून | २५ | ५७ |
| उदयापासून करण्यास | — ६ | |
| | १९ | ५७·० |
| फरेंच गणित | १९ | ५६ |

**अस्त (पॅरीस)**

सूत्र २ रें.—

| ता. | मि. | |
|---|---|---|
| १२ | ० | वरील सूत्र २ रें |
| + | २ | किरणपुरस्सरण. |
| १२ | २ | |
| — १ | ५५ | चर संस्कार. |
| १० | ७ | |
| + | ४ | उदयांतर मि. |
| १० | ११ | |
| — ६ | | तास. |
| ४ | | |

| | ता. | मि. |
|---|---|---|
| अस्त .. | ४ | ११ |
| फरेंच गणित | ४ | १२ |

## रवीची दिनस्पष्टगति व स्पष्ट बिंब

४७. **रवीची दिनस्पष्टगति व स्पष्ट बिंब.**—ज्या केन्द्राच्या आधारें रविमंदसाधन केलें त्याच रविकेंद्राच्या ३५९·६५ आधारें दिनस्पष्टगति काढावयाची असते. कोष्टक ११ वें त्याकरिता तयार केलें आहे—

**रवीची दिनस्पष्टगति व स्पष्टबिंब.**—ज्या केन्द्राच्या आधारें रविमंदसाधन केलें त्याच रविकेन्द्राच्या ३५९·६५ आधारें दिनस्पष्ट गति काढायची असते. कोष्टक ११ वें त्याकरितां तयार केलें आहे —

| बिंब | | बिंबार्ध | पूर्ण बिंब |
|---|---|---|---|
| | | क. वि | |
| (अ) को. ११ उप. र. कें. ३५९°·६५ | .. | १६ १७ | ३२′·३४″ |
| फरेंच गणित .. .. | .. | | ३२′·३६″ |

---

| गति | | दिनगति |
|---|---|---|
| (ब) को. ११ उप. र. कें. ३५९·६५ | .. | ६१′·१०″ |
| फरेंच गणित .. .. | .. | ६१′·१०″ |

(**टीप.**—वेधसाम्यार्थ **न्युटेशन** व **अब्बीरेशन** हे दोन संस्कार पाश्चिमात्य ज्योतिषी अनुक्रमें संपाताला व सूर्याला देतात. यांपैकीं न्युटेशन आम्हीं स्वीकारलेला आहे. दुसरा **अब्बीरेशन** हा आयत्या वेळीं वाटल्यास द्यावा.)

अनुक्रमणिका

## कोष्टक १ लें

## रवीची मध्यम गति

### उपकरणें—क्षेपक, चक्रें व अहर्गण—अंशात्मक गति

उज्जयिनी शके १८०० चैत्र शुद्ध प्रतिपदा—३ री एप्रिल सन १८७८ बुधवारीं
मध्यम सूर्योदयीं सूर्याचें मध्यम स्थान म्हणजे

(अ) क्षेपक—३४९·०८७ अंश

| चक्रें (१) | गति (२) | दिवस (३) | गति (४) | दिवस (५) | गति (६) |
|---|---|---|---|---|---|
| १ | ·१२७३ | १ | ०·९८५६ | १०० | ९८·५६०९ |
| २ | ·२५४६ | २ | १·९७१२ | २०० | १९७·१२१८ |
| ३ | ·३८१९ | ३ | २·९५६८ | ३०० | २९५·६८२८ |
| ४ | ·५०९२ | ४ | ३·९४२४ | | |
| ५ | ·६३६५ | ५ | ४·९२८० | ४०० | ३९४·२४३७ |
| ६ | ·७६३८ | ६ | ५·९१३७ | ५०० | १३२·८०४६ |
| | | | | ६०० | २३१·३६५५ |
| ७ | ·८९११ | ७ | ६·८९९३ | | |
| ८ | १·०१८५ | ८ | ७·८८४९ | | |
| ९ | १·१४५७ | ९ | ८·८७०५ | ७०० | ३२९·९२६४ |
| | | | | ८०० | ६८·४८७४ |
| १० | १·२७३० | १० | ९·८५६१ | ९०० | १६७·०४८३ |
| ११ | १·४००३ | ११ | १०·८४१७ | | |
| १२ | १·५२७६ | १२ | ११·८२७३ | | |
| १३ | १·६५४९ | १३ | १२·८१२९ | १००० | २६५·६०९२ |
| १४ | १·७८२२ | १४ | १३·७९८५ | २००० | १७१·२१८४ |
| १५ | १·९०९५ | १५ | १४·७८४१ | ३००० | ७६·८२७६ |
| १६ | २·०३६८ | | | | |
| १७ | २·१६४१ | १६ | १५·७६९८ | | |
| १८ | २·२९१५ | १७ | १६·७५५४ | ४००० | ३४२·४३६८ |
| १९ | २·४१८७ | १८ | १७·७४१० | ५००० | २४८·०४६० |
| २० | २·५४६० | १९ | १८·७२६६ | ६००० | १५३·६५५२ |
| ३० | ३·८१९० | २० | १९·७१२२ | | |
| ४० | ५·०९२० | ३० | २९·५६८३ | | |
| ५० | ६·३६४९ | ४० | ३९·४२४४ | | |
| ६० | ७·६३७९ | ५० | ४९·२८०५ | | |
| ७० | ८·९१०९ | ६० | ५९·१३६५ | | |
| ८० | १०·१८३९ | ७० | ६८·९९२६ | | |
| ९० | ११·४५६९ | ८० | ७८·८४८७ | | |
| १०० | १२·७२९८ | ९० | ८८·७०४८ | | |

अनुक्रमणिका

कोष्टक २ रें

## रवीची तास, मिनिटें, सेकंदें यांची मध्यम गति—अंशात्मक

| तास | रवीची तास गति अंश | मि. | रवीची मि. गति अंश | मि. | रवीची मि. गति अंश | से. | रवीची से. गति अंश | से. | रवीची से. गति अंश |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ·०४११ | १ | ·०००७ | ३१ | ·०२१३ | १ | ·०००१ | ३१ | ·००३५ |
| २ | ·०८२१ | २ | ·००१४ | ३२ | ·०२१९ | २ | ·०००२ | ३२ | ·००३६ |
| ३ | ·१२३२ | ३ | ·००२० | ३३ | ·०२२६ | ३ | ·०००३ | ३३ | ·००३८ |
| ४ | ·१६४३ | ४ | ·००२७ | ३४ | ·०२३३ | ४ | ·०००५ | ३४ | ·००३९ |
| ५ | ·२०५३ | ५ | ·००३४ | ३५ | ·०२३९ | ५ | ·०००६ | ३५ | ·००४० |
| ६ | ·२४६४ | ६ | ·००४१ | ३६ | ·०२४६ | ६ | ·०००७ | ३६ | ·००४१ |
| ७ | ·२८७५ | ७ | ·००४८ | ३७ | ·०२५३ | ७ | ·०००८ | ३७ | ·००४२ |
| ८ | ·३२८५ | ८ | ·००५५ | ३८ | ·०२६० | ८ | ·०००९ | ३८ | ·००४३ |
| ९ | ·३६९६ | ९ | ·००६२ | ३९ | ·०२६७ | ९ | ·००१० | ३९ | ·००४४ |
| १० | ·४१०६ | १० | ·००६८ | ४० | ·०२७४ | १० | ·००११ | ४० | ·००४६ |
| ११ | ·४५१७ | ११ | ·००७५ | ४१ | ·०२८१ | ११ | ·००१२ | ४१ | ·००४७ |
| १२ | ·४९२८ | १२ | ·००८२ | ४२ | ·०२८७ | १२ | ·००१४ | ४२ | ·००४८ |
| १३ | ·५३३९ | १३ | ·००८९ | ४३ | ·०२९४ | १३ | ·००१५ | ४३ | ·००४९ |
| १४ | ·५७४९ | १४ | ·००९६ | ४४ | ·०३०१ | १४ | ·००१६ | ४४ | ·००५० |
| १५ | ·६१६० | १५ | ·०१०३ | ४५ | ·०३०८ | १५ | ·००१७ | ४५ | ·००५१ |

अनुक्रमणिका

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १६ | ·६५७१ | १६ | ·०१०९ | ४६ | ·०३१५ | १६ | ·००१८ | ४६ | ·००५२ |
| १७ | ·६९८१ | १७ | ·०११६ | ४७ | ·०३२२ | १७ | ·००१९ | ४७ | ·००५४ |
| १८ | ·७३९२ | १८ | ·०१२३ | ४८ | ·०३२८ | १८ | ·००२० | ४८ | ·००५५ |
| १९ | ·७८०३ | १९ | ·०१३० | ४९ | ·०३३५ | १९ | ·००२२ | ४९ | ·००५६ |
| २० | ·८२१३ | २० | ·०१३७ | ५० | ·०३४२ | २० | ·००२३ | ५० | ·००५७ |
| २१ | ·८६२४ | २१ | ·०१४४ | ५१ | ·०३४९ | २१ | ·००२४ | ५१ | ·००५८ |
| २२ | ·९०३५ | २२ | ·०१५१ | ५२ | ·०३५६ | २२ | ·००२५ | ५२ | ·००५९ |
| २३ | ·९४४५ | २३ | ·०१५७ | ५३ | ·०३६३ | २३ | ·००२६ | ५३ | ·००६० |
| २४ | ·९८५६ | २४ | ·०१६४ | ५४ | ·०३७० | २४ | ·००२७ | ५४ | ·००६२ |
| | | २५ | ·०१७१ | ५५ | ·०३७६ | २५ | ·००२८ | ५५ | ·००६३ |
| | | २६ | ·०१७८ | ५६ | ·०३८३ | २६ | ·००३० | ५६ | ·००६४ |
| | | २७ | ·०१८५ | ५७ | ·०३९० | २७ | ·००३१ | ५७ | ·००६५ |
| | | २८ | ·०१९२ | ५८ | ·०३९७ | २८ | ·००३२ | ५८ | ·००६६ |
| | | २९ | ·०१९८ | ५९ | ·०४०४ | २९ | ·००३३ | ५९ | ·००६७ |
| | | ३० | ·०२०५ | ६० | ·०४११ | ३० | ·००३४ | ६० | ·००६८ |

या मराठी ग्रहगणितावरून २७ घ. १४ पळें या वेळचें गणित केलें म्हणजे तें पारीस मध्यम दोन प्रहरचें होतें हें स्पष्ट आहे.

मग या उज्जयिनीच्या मध्यम कालास दिवसाचें दशांशरूप देऊन त्यानें त्या त्या कोष्टकांतील त्या त्या ग्रहाच्या एक दिवसाच्या अंशात्मक गतीला गुणून गुणाकार उज्जयिनीच्या मध्यम सूर्योदयकालीन स्थानांत मिळविला म्हणजे **इष्ट गांवीं** इष्ट मध्यमकालीन भोग येतात.

परंतु या नवीन आवृत्तींत आम्हीं घटिका व पळें यांची मध्यम गतीचीं कोष्टकेंच दिलीं आहेत. त्यावरून गति मिळते. घटी–पळांना दिनात्मक रूप देण्याची जरुरी नाहीं.

पण गुरु व शनि हे बलाढ्य ग्रह परस्परांस ओढून परस्परांच्या मध्यम भोगांत बरेंच अंतर उत्पन्न करितात. यासाठीं इष्ट शकवर्ष उपकरण घेऊन २ ऱ्या कोष्टकांतून त्यांचे मोठे आकर्षणसंस्कार काढावे. इष्ट शकवर्ष कोष्टकांत नसेल तर त्या वर्षांत १२० वर्षांची कांहीं पट मिळवून वजा करून कोष्टकांतील वर्ष आणून त्याच्यावरून संस्कार काढावा.

मध्यमगुरूंतून[1] मध्यमशनि वजा करून येणाऱ्या उपकरणानें ३ ऱ्या कोष्टकांतून गुरूचा लहान संस्कार आणून तो गुरूच्या मोठ्या संस्काराखालीं मांडावा.

पुन्हां मध्यमगुरूंतून मध्यमशनीची दुप्पट वजा करून येणाऱ्या उपकरणानें ४ थ्या कोष्टकांतून शनीचा लहान संस्कार आणून तो शनीच्या मोठ्या संस्काराखालीं मांडावा.

हे मोठे व लहान संस्कार गुरु व शनि यांस दिले म्हणजे त्यांचे आकर्षण संस्कृत मध्यमभोग येतात. आकर्षणसंस्कृत भोगासच पुढें सोईसाठीं मध्यम भोग म्हटलें आहे.

पंचांगासाठीं ग्रह तयार करण्याचे असेल तेव्हां हें सर्व मध्यम गणित वर्षाच्या पहिल्या पंधरवड्याचें एकदा तयार केलें म्हणजे काम होतें. पुढील पंधरवड्याचे दिवस १३ पासून १६ पर्यंत असतील तितक्या दिवसांची मध्यमगति १ ल्या कोष्टकांत शेवटीं दिली आहे ती क्रमानें मिळवीत गेल्यानें पुढील पंधरवड्यांचीं मध्यम मानें तयार होतात.

**ग्रहांचीं नीचें व पात यांचे भोग—**

५ व्या व ६ व्या कोष्टकांत ग्रहांचीं नीचें व पात यांचे क्षेपक व चक्रगति हीं दिलीं आहेत. त्यावरून वर सांगितलेल्या रीतीनें इष्ट चक्राच्या आरंभींचीं मानें आणावीं. नीचें व पात यांच्या गति अत्यंत मंद आहेत. म्हणून त्यांच्या अहर्गणगति दिल्या नाहींत. पाहिजे असल्यास ६९४० दिवसांत जर एकचक्राची गति उत्पन्न होते तर इष्ट अहर्गणांत किती या त्रैराशिकानें त्या आणाव्या.

सूर्यास पात नाहीं म्हणून त्याच्या पाताच्या सदरांत क्रांतिपाताचा भोग म्हणजे **अयनांश** दिले आहेत. अयनगति एका चक्राच्या अवधींत ०°·२६५ असल्यामुळें तिची उपेक्षा करिता येत नाहीं. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें त्रैराशिकानें आणून ती चक्रगतीप्रमाणें आपल्या क्षेपकांत मिळवावी.

[1] गुरूंतून म्हणजे गुरूच्या भोगांतून असें जाणावें. यापुढें ग्रहशब्द, ग्रहभोग या अर्थी लाघवासाठीं योजिला आहे. कोठें कोठें याच अर्थी ग्रहांचीं आद्याक्षरेंहि योजिलीं आहेत.

अनुक्रमणिका

मध्यमभोग आणण्याची रीति वर सविस्तर सांगितली आहे. ती थोडक्यांत ध्यानांत यावी म्हणून पुढील समीकरणें दिलीं आहेत.

## ग्रहगणित

### मध्यमस्थानगणितसूत्रें

| | | |
|---|---|---|
| मध्यमग्रहभोग = | क्षेपक | कोष्टक १ लें. |
| | + चक्रगति | सदर. |
| | + अहर्गणगति | सदर. |
| | + रेखांतर संस्कृत दिनांशगति | त्रैराशिकानें. |
| | + मोठा संस्कार | कोष्टक २ रें. |
| | + लहान संस्कार | को. ३ रें व ४ थें. |

| | | |
|---|---|---|
| नीचयोग = | क्षेपक | कोष्टक ५ वें. |
| | + चक्रगति | सदर. |
| | + अहर्गणगति (इष्ट असेल तर) | त्रैराशिकानें. |

| | | |
|---|---|---|
| पातभोग = | क्षेपक | कोष्टक ६ वें. |
| | — चक्रगति | सदर. |
| | — अहर्गणगति (इष्ट असेल तर) | त्रैराशिकानें. |

| | | |
|---|---|---|
| अयनांश[1] = | क्षेपक | कोष्टक ६ वें. |
| | + चक्रगति | सदर. |
| | + अहर्गणगति | त्रैराशिकानें. |

**उदाहरण.**—शके १८२८ पौष कृष्ण २ या बुधवारीं म्हणजे इ. स. १९०७ जानेवारी तारीख २ री या दिवशीं पारीस शहराच्या मध्यम दोनप्रहरीं सूर्यादि आठ ग्रह आकाशांत कोठें दिसतील ते सांगा. पारीसचें (नं. १३०) रेखांतर पश्चिमेस ७३४ पळें आहे (कोष्टक १५४ पाहा). इष्ट दिवशीं चक्र १ व अहर्गण ३५६० आहे.

आठ ग्रहांपैकीं उदाहरणार्थ येथें फक्त गुरूच्या गणिताचा प्रकार सविस्तर सांगितला आहे.

(न्यास १ ला पाहा). पहिल्या कोष्टकाच्या शिरोभागीं गुरूच्या मध्यम भोगाचा क्षेपक २७५°·६७ आहे तो लिहून त्याच्याखालीं एका चक्राची गति २१६°·६५ लिहून अहर्गणाच्या तीन ३०००+५००+६० खंडावरून येणाऱ्या गति त्यांच्याखालीं मांडल्या आहेत.

---

[1] न्युटेशन नांवाचा १७ विकला संस्कार अयनांशास देण्याचा असतो. पण आम्हांस इतकी सूक्ष्मता नको आहे, म्हणून तो येथें सांगितला नाहीं.



अनुक्रमणिका

पारिसच्या स्थानिक मध्यमकालाचे दोन प्रहर म्हणजे १५ घटिका यांत रेखांतर १२ घ. १५ प. पश्चिम आहे म्हणून धन समजून मिळवून आलेली बेरीज २७ घ. १५ प. ही उज्जयिनी-च्या मध्यम सूर्योदयापासून वेळ झाली. हिला ६० घटिकांनीं भागून दिवसाचें दशांशरूप ० ·४५४ आलें. (खालीं टीप ** पाहा.) यानें १ ल्या कोष्टकांतील रवीच्या एका दिवसाच्या गतीला ·९८६ अंश गुणून गुणाकार ·४४७६ अंशात्मक आला.

**टीप.**—कोष्टक २ व ३ यांत तास, मिनिटें, सेकंद यांची व घटी, पळें, विपळें यांची प्रत्यक्ष गति व दिली असल्यानें दिनांश न करतांच गति येते ती अशी :—

| को. २ रवि गति | | को. ३ | |
|---|---|---|---|
| १० ता. | ·४१०६ | २७ घ. | ·४४३५ |
| ५४ मि. | ·०३७० | १५ प. | ·००४१ |
| | ·४४७६ | | ·४४७६ |

हीं दोन्हीं फलें वरील ·४४७६ या गुणाकाराशीं जमतात.

## पद्धति

वर दिवसाचें दशांशरूप ·४५४ आलें त्यानें गुरूच्या ८७ व्या कोष्टकांतील एका दिवसाच्या ·०८३१ गतीला गुणून गुणाकार ·०३७७२ आला. आम्हांस अंशाच्या शतांशापेक्षां जास्त सूक्ष्मतेची आवश्यकता नाहीं असें मानिलें आहे. म्हणून किंचित् न्यून पूर्ण करून आलेली गति ०° ·०४ अहर्गणोत्पन्न गतीच्या खालीं लिहून वरील सर्व रकमांची बेरीज करितां ती ६८° ·१७ येते. हा इष्टकालीं गुरूचा मध्यम भोग झाला. आतां गुरूवरील शनीचे आकर्षणाचे संस्कार काढिले पाहिजेत.

इष्ट शक वर्ष १८२८ यावरून ८८च्या कोष्टकांत गुरूचा मोठा आकर्षण संस्कार + ०° ·२१ येतो.

तसेंच ८९ व्या कोष्टकाचें उपकरण (गु-श) हें आहे. म्हणून मध्यम गुरु ६८° ·१७ उणा शनि ३२९° ·७० बरोबर ९८° ·४७ या उपकरणानें ८९ व्या कोष्टकांतून गुरूचा लहान संस्कार—०° ·०५ आला. हे दोनहि संस्कार गुरूच्या मध्यम भोगास ६८° ·१७ दिल्यानें त्याचा आकर्षण संस्कृत मध्यमभोग ६८° ·३३ झाला.

नीचें व पात यांच्या गणिताचा प्रकार वर दर्शविल्याप्रमाणेंच आहे. म्हणून विवरणाची जरुरी नाहीं. न्यास पाहून तो सहज लक्षांत येईल.

---

धाहा संस्कार द्वितीयावृत्तींत समाविष्ट केला आहे. (संपादक, द्वि. आवृत्ति.)

**टीप.**—** पुढील विवेचनांत याचा खुलासा केला आहे तो पाहावा.

A-1953—28-B.

अनुक्रमणिका

बुधादि सप्त ग्रहांचे पात व शुक्रनीच यांची गति विलोम असते हें ध्यानांत ठेवावें. अहर्गण २५६० ÷ ६९४० = ·५ सुमारें येतात म्हणून प्रकृत न्यासांत जागा वांचविण्यासाठी नीच चक्राची गति एकदम नीचास दिली आहे.

वर जीं ग्रहांचीं मध्यमस्थानें आणिलीं आहेत तीं साधारणतः त्या त्या ग्रहाच्या कक्षेच्या उच्चाजवळच्या नाभींत (फोकसांत) उभा राहून ग्रहांकडे पाहणाऱ्यास ते ग्रह आकाशांत जेथें दिसतात तेथील आहेत[1]. उच्चासन्ननाभि केवळ पोकळी आहे. म्हणून त्याला पोकळ नाभि म्हणतात (Empty Focus). पण सर्व ग्रहांच्या नीचासन्ननाभींत सूर्य असतो म्हणून सूर्याच्या मध्यबिंदुस्थानीं उभें राहून पाहिलें तर ग्रह कोठें दिसतील त्यांचें गणित निराळें केलें पाहिजे. या गणितास रविमध्य गणित म्हणतात.

## रविमध्य गणित

मध्यम ग्रहांतून त्याचें नीच वजा करून बाकी राहील त्यास **मंदकेंद्र** म्हणतात. मंदकेंद्र उपकरणानें ७ व्या कोष्टकांतून **मंदफल** नांवाचा संस्कार काढून तो मध्यम ग्रहास द्यावा म्हणजे त्याचें **कक्षावृत्तीय** रविमध्यस्थान येतें. अथवा समीकरणानें थोडक्यांत सांगावयाचें तर मध्यमग्रह + मंदफल = कक्षावृत्तीय रविमध्यग्रह.

पण प्रत्येक ग्रहाच्या कक्षेची पातळी निराळी असते. म्हणून कांहीं एका नियमित कक्षेच्या पातळीच्यासंबंधानें सर्व ग्रहांचीं स्थानें सांगणें बरें असें ज्योतिःशास्त्रवेत्त्यांस दिसून आल्यामुळें त्यांनीं अशा कामासाठीं क्रांतिवृत्ताची योजना केली आहे. कक्षावृत्तीय स्थानावरून क्रांति-वृत्तीय स्थान आणण्यासाठी जो संस्कार करावा लागतो त्याला **परिणति** संस्कार म्हणतात.

**परिणति-संस्कार.**—कक्षावृत्तीय ग्रहांतून त्याचा पात वजा करावा आणि बाकीला पातोनग्रह म्हणावें. पातोनग्रह उपकरणानें त्या त्या कोष्टकांतून परिणति संस्कार आणून तो कक्षावृत्तीय ग्रहास द्यावा म्हणजे त्याचें क्रांतिवृत्तीय रविमध्यस्थान सिद्ध होतें.

कक्षावृत्तीय ग्रह + परिणति = क्रांतिवृत्तीय ग्रह.

**उदाहरण.**—(न्यास २ रा पाहा.) यांत मध्यमगुरु ६८°·३३ आहे. यांतून गुरूचें नीचस्थान ३५०°·२६ वजा करून आलें. मंदकेंद्र ७८°·०७ या उपकरणानें ७ व्या कोष्टकांतून मंदफल +५°·४६ आणून त्याचा मध्यमगुरूला संस्कार केल्यानें त्याचें आपल्या कक्षावृत्ता-वरील स्थान ७३°·७९ सिद्ध झालें.

नंतर ७३°·७९ यांतून गुरूचा पात ७६°·९५ वजा करून बाकी ३५६°·८४ हा पातोन-गुरु झाला. या उपकरणानें ९२ व्या कोष्टकांतून परिणति-संस्कार ० आला. त्याचा कक्षावृत्तीय गुरूला ७३°·७९ संस्कार करून ७३°·७९ हा **क्रांतिवृत्तीय** गुरु झाला.

पुन्हा पातोन गुरु ३५६°·८४ या उपकरणानें ९४ व्या कोष्टकांतून गुरूचा **रविमध्यशर** काढला तर तो −३°·९० येतो. ऋण म्हणजे दक्षिण.

---

[1] ही गोष्ट पुढें सोपपत्तिक सिद्ध केली आहे.

गुरूचें मंदकेंद्र ७८° · ०७ यानें ९५ व्या कोष्टकांतून **मंदकर्ण** काढला तो ५ · १६२ आला.

पुढील भूमध्यगणितास लागणारा दीर्घवर्तुलांशाचा गुणक तयार करण्याचीं साधनें रविमध्यगणितांतील उपकरणावर व कोष्टकावर अवलंबून असल्यामुळें तो आणण्याचा प्रकार येथेंच सांगणें बरें.

**दीर्घवर्तुलांश गुणक.**—मंदकेंद्र उपकरणानें ९५ व्या कोष्टकांतून ग्रहांचे मंदकर्ण आणावे. रविमंदकेंद्र उपकरण घेऊन ९६ व्या कोष्टकांतून ग्रहांचीं समांतरें आणावीं. नंतर या दोहोंचें ऐक्य (चिन्हाप्रमाणें) करून त्यांतून बुधादिकांचे मध्यम मंदकर्ण अनुक्रमें ·३८७१, ·७२३३, १·५२३७, ५·२०३, ९·५५५, १९·२१८, ३०·११० वजा करावे म्हणजे त्या त्या ग्रहाचे गुणक येतात.

मंदकर्ण + समांतर — मध्यममंदकर्ण = दीर्घवर्तुलांश गुणक.

**उदाहरण.**—गुरूचें मंदकेंद्र ७८° · ०७ यानें ९५ व्या कोष्टकांतून गुरूचा मंदकर्ण ५ · १६२ काढला. पुन्हां रविमंदकेंद्र ३५९° · ६६ यानें ९६ व्या कोष्टकांतून गुरूचें समांतर + ० · ०८७ आणिलें. या दोहोंची बेरीज ५ · २४९ यांतून गुरूचा मध्यममंदकर्ण ५ · २०३ वजा केल्यानें बाकी + ० · ०४६ हा त्याचा **दीर्घवर्तुलांश** गुणक आला.

याप्रमाणें रविमध्यांतून दिसणारे गुरूचे क्रांतिवृत्तावरचे अवच्छेदक म्हणजे **भोग** व **शर** आले. पण सूर्याचा मध्यबिंदु आम्हांस (भूलोकींच्या रहिवाश्यांस) दुर्गम असल्यामुळें रविमध्यगणिताची प्रतीति पाहणें आम्हांस अशक्य आहे. सूर्य, पृथ्वी व ग्रह हे एका रेषेंत आल्या वेळीं म्हणजे ग्रहाच्या सूर्यापासून षड्भांतरप्रसंगीं मात्र या गोष्टीचा संभव असतो. पण असे प्रसंग बहिर्ग्रहांच्यासंबंधानें वर्षांतून एकदा मात्र येतात. म्हणून इतर पाहिजे त्या वेळीं भूमध्यांतून पाहणाऱ्यास ग्रह आकाशांत कोठें दिसेल तें स्थान ठरविण्यासाठीं पुन्हां निराळें गणित केलें पाहिजे. या गणिताला भूमध्यगणित म्हणतात.

अनुक्रमणिका

## भूमध्य गणित

**भूमध्य दृश्य भोग.**—रविमध्यग्रहांतून मंदस्पष्ट रवि वजा करून जी बाकी येईल तिला **शीघ्रकेंद्र** म्हणतात. शीघ्रकेंद्र उपकरणानें ९७ व्या कोष्टकांतून दीर्घवर्तुलांश आणून त्यास रविमध्यगणिताच्या शेवटीं साधलेल्या गुणकानें गुणावें. गुणाकार **दीर्घवर्तुल** नांवाचा प्रथम संस्कार होतो.

दीर्घवर्तुलांश × गुणक = दीर्घवर्तुलसंस्कार.

पुन्हा शीघ्रकेंद्र उपकरणानें ९८ व्या कोष्टकांतून **इनांतर** नांवाचा **दुसरा** संस्कार काढावा. मग हे दोनहि संस्कार **मंदस्पष्ट रवीला** केले म्हणजे भूमध्यदृश्य ग्रह भोग येतो.

मंदस्पष्ट रवि + दीर्घवर्तुल संस्कार + इनांतर = भूमध्यदृश्यग्रह.

**उदाहरण.**—(**न्यास ३ रा पाहा**) रविमध्यगुरु ७३° ·७९ यांतून स्पष्ट रवि २५८° ·४२ वजा करून बाकी राहिली १७५° ·३७ हें शीघ्रकेंद्र झालें. या शीघ्रकेंद्र उपकरणानें ९७ व्या कोष्टकांतून गुरूचा दीर्घवर्तुलांश + ०° ·१५ आला. त्याला रविमध्यगणिताच्या शेवटं साधलेल्या गुणकानें + ·०४६ गुणून गुणाकार + ०° ·०१ हा दीर्घ **वर्तुलांश** संस्कार झाला.

पुन्हा शीघ्रकेंद्र १७५° ·३७ उपकरणानें ९८ व्या कोष्टकांतून गुरूचा इनांतर संस्कार काढला तो +१७४° ·२७ आला. हे दोनहि संस्कार मंदस्पष्ट रवीत २५८° ·४२ मिळवून गुरूचा **भूमध्यस्पष्ट** भोग ७२° ·७० म्हणजे ७२ अंश ४२ कला आला.

**भूमध्यदृश्यशर.**—शीघ्रकेंद्र या उपकरणानें ९९ व्या कोष्टकांतून शीघ्रकर्ण आणावा. मग रविमध्यदृश्यशराला मंदकर्णानें गुणून गुणाकारास शीघ्रकर्णानें भागावें. भागाकार भूमध्यांतून दिसणारा ग्रहशर होतो.

मंदकर्ण व शीघ्रकर्ण हे नेहमीं धन असतात. म्हणून रविमध्यशराची जी दिशा तीच भूमध्यशराची दिशा असते. शराच्या मागें धन चिन्ह असेल तर तो उत्तर, ऋण चिन्ह असेल तर तो दक्षिण असें जाणावें.

रविमध्यशर × मंदकर्ण ÷ शीघ्रकर्ण = भूमध्यशर.

**उदाहरण.**—गुरूच्या शीघ्रकेंद्रानें १७५° ·३७ नोंदाच्या कोष्टकांतून गुरूचा शीघ्रकर्ण ४·२०४ आणिला. नंतर —३' ·९० या त्याच्या रविमध्यशरास त्याच्या मंदकर्णानें ५·१६२ गुणून आलेल्या गुणाकारास —२०' ·१३१८ शीघ्रकर्णानें ४·२०४ भागून भागाकार ४' ·८ हा गुरूचा **भूमध्य दृश्यशर** झाला.

**भूमध्यदृश्य दिनगति**—ग्रहाच्या शीघ्रकेंद्रानें १०० व्या कोष्टकांतून गतिफल आणून त्याचा सूर्याच्या मध्यमगतीला म्हणजे ५९' ·१ क. यांना संस्कार करावा म्हणजे भूमध्यदृश्य दिनगति येते. दिनगति धन असेल तर ग्रह मार्गी असतो पण ऋण येईल तर तो **वक्री** आहे असें जाणावें.

अनुक्रमणिका

५९′·१ + गतिफल = भूमध्यदृश्य दिनगति.

**उदाहरण**.—गुरूचें शीघ्रकेंद्र १७५°·३७ यानें १०० व्या कोष्टकांतून गतिफल—६७′·० आणून त्याचा ५९′·१ याशीं संस्कार करून आली. गुरूची भूमध्यदृश्य दिनगति—७′·९ ही ऋण आहे म्हणून इष्ट दिवशीं गुरु—७′·९ मागें जाईल म्हणजे त्याची गति वक्र किंवा विलोम असेल.

**बुधदिनगति विशेष**.—१०० व्या कोष्टकांत जीं गतिफलें दिलीं आहेत तीं सर्व ग्रहकक्षा वर्तुलाकार व ग्रहगति मध्यम आहेत असें कल्पून तयार केलीं आहेत. पण ही कल्पना बुधाच्या वस्तुस्थितीशीं फारशी जुळत नाहीं. त्याची कक्षा बरीच लांबोडी असून दिनगति ही मोठी अगाटप्याची आहे. या दोन कारणांची उपेक्षा केल्यामुळें त्याचें गतिफल बरेंच स्थूल झालें आहे. तें सूक्ष्म होण्यासाठीं पुढें सांगितल्याप्रमाणें विशेष गणित केलें पाहिजे.

बुधाचें मंदकेंद्र उपकरण घेऊन १०० व्या उपकोष्टकांतून **गतिफलगुणक** व वर्तुलांश गुणक असे दोन गुणक काढावे. नंतर त्या गुणकांनी पूर्वी आणलेल्या आपापल्या गुण्यास गुणून येणाऱ्या शुद्ध मानाचा ५९′·१ कलांना संस्कार करावा म्हणजे सूक्ष्मगति येईल.

**उदाहरण**:—बुधाचें मंदकेंद्र रविमध्यगतिप्रसंगीं आणिलेलें (२ रा न्यास पाहा) १३०°·४५ आहे. या उपकरणानें ६१ व्या उपकोष्टकांतून गुणक काढले ते ·८१ व + ·००३१ असे आले. ३ ऱ्या न्यासांत बुधाचें गतिफल + ४१·३ कला आहे व वर्तुलांश—३१′·९ आहेत. याग ६० नीं गुणून कला कराव्या. मग:—

| | क. |
|---|---|
| रविमध्यमगति .. .. .. | ५९·१ |
| + ४१·३ × ·८१ .. .. .. | + ३३·४ |
| — ३१°·९ × ६० (+ ·००३१) .. .. | — ५·९ |
| बुधाची भूमध्यदृश्य दिनगति .. .. | ८६·६ |

**ग्रहांचीं बिंबें** (Discs).—बुधादिग्रहांचीं भूमध्यदृश्य बिंबें १५० व्या कोष्टकांत दिलीं आहेत. त्याचें उपकरण शीघ्र केंद्र आहे. **उदा**.—गुरूचें शीघ्र केंद्र १७५·३७ यानें सदर कोष्टकांतून गुरूचें बिंब ४६″·० येतें.

**ग्रहांच्या कला** (Phases).—ग्रहांचीं बिंबें सर्वदा पूर्ण प्रकाशित नसतात. चंद्राप्रमाणें त्यांनाहि कला असतात. शुक्र मंगळ हे ग्रह पृथ्वीच्या संनिध असल्यामुळें त्यांच्या कला दुर्बिणींतून स्पष्ट दिसतात. शुक्र अंतर्ग्रह असल्यामुळें त्याच्या बिंबावर शुक्ल व कृष्ण या दोन्ही पक्षांच्या सर्व तिथींच्या कला क्रमानें दिसून येतात. मंगळ बहिर्ग्रह (Superior Planet) असल्यामुळें त्याच्या बिंबावर शुक्ल १२ शीं पासून कृष्ण ३ ये पर्यंत क्षयवृद्धि दिसते.

या दोन ग्रहांच्या कला १५० व्या कोष्टकांत दिल्या आहेत. **उदा.**—शुक्र व मंगळ यांची शीघ्र केंद्रें (भाग ३ पहा) अनुक्रमें २००°·० व २६०° आहेत. यावरून त्यांच्या अनुक्रमें २५ व १८ तिथि येतात. म्हणजे शुक्रबिंब कृष्ण १० मीच्या चंद्रबिंबाप्रमाणें दिसेल व मंगळबिंब कृष्ण ३ येच्या चंद्राप्रमाणें दिसेल.

**ग्रहांचीं क्षितिज लंबनें** (Horizontal Paralax) :—सूर्याचें मध्यम क्षितिज लंबन ८"·८ आहे. या संख्येला सूर्याच्या इष्ट दिवसाच्या मंदकर्णानें भागिलें तर त्या दिवसाचें सूर्याचें क्षितिज लंबन येतें. याच ८"·८ ला इतर ग्रहांच्या शीघ्र कर्णांनीं भागिलें म्हणजे त्यांचीं इष्ट दिवसाचीं क्षितिजलंबनें येतात. हीं फार अल्प असतात म्हणून तीं कोष्टकांत दिलीं नाहींत. **उदा.**—गुरूच्या शीघ्र कर्णानें ४·२०४ वरील संख्येस भागिलें तर इष्ट दिवशीं गुरूचें लंबन २"·१ होतें असें निष्पन्न होतें. **इंद्राच्या** शीघ्रकर्णानें २९·० भागिलें तर त्याचें लंबन फक्त ०"·३ येतें. यावरून इंद्रग्रहावरून आमची पृथ्वी बहुधा दिसत नसावी. कारण ती सूर्यापासून पुढें किंवा मागें २ अंशापेक्षां दूर कधींहि जात नाहीं. तथापि सूर्याचें तेजहि १००० पट कमी झालें असतें. म्हणून कदाचित् मोठ्या दुर्बिणीतून दिसली तर दिसेल.

वर अनुसरलेल्या सरणीच्या क्रमानें (१) मध्यम (२) रविमध्य व (३) भूमध्य या तीन प्रकारच्या गणिताचा न्यासंबंधहि पुढील पृष्ठावर करून दाखविला आहे.

याप्रमाणें ज्यानापकर्माशिवाय ग्रहांचीं स्थानें सिद्ध करण्याची रीति तर दाखविली.

### सूक्ष्मत्वाकडे प्रवृत्तीचा कल

आतां भारतीय ज्योतिर्विद सूक्ष्मत्वाकडे झुकले आहेत. वरील पद्धति आणखी कांहीं वर्षें चालली तरी सूक्ष्मसाधनाची आवड वाढणार यांत संशय नाहीं. अर्थात् भूमध्यग्रहसाधन त्रिकोणमितीच्या साहाय्यानेंच यापुढें व्हावयास पाहिजे हें ओळखून पुढील प्रकरणांत आम्ही ती सूक्ष्मपद्धतिहि देऊन ठेविली आहे.

अनुक्रमणिका

**उज्जयिनी काल घटका २७ पळें १४, पौष कृ. २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७, या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्याय १ ला. मध्यम गणित | | कोष्टक | रवि | कोष्टक | बुध |
|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | अं | | अं |
| १ | चै. शु. १ दा. शके १८००, क्षेपक | .. | १ | ३४९·०८७० | ४५ | ५२·५००० |
| २ | १ चक्रगति | .. | १ | ·१२७३ | ४५ | ३२०·८३१३ |
| ३ | ३,००० दिनगति | .. | १ | ७६·८२७६ | ४५ | ३७·०१६४ |
| ४ | ५०० दिनगति | .. | १ | १३२·८०४६ | ४५ | २४६·१६९४ |
| ५ | ६० दिनगति | .. | १ | ५९·१३६५ | ४५ | २४५·५४०३ |
| ६ | १० तासगति | .. | २ | ·४१०६ | ४६ | १·७०५१ |
| ७ | ५४ मिनिटगति | .. | २ | ·०३७० | ४६ | ·१५३५ |
| ८ | निज मध्यमभोग म | .. | | २५८·४३०६ | | १८३·९१६० |
| ९ | मोठा आकर्षण संस्कार श. १८२९ | .. | | | | |
| १० | (लहान संस्कार, उप. (गु—श)—९८·४७ | .. | | | | |
| ११ | (गु—२ × श)—उप. १२८·७८ | .. | | | | |
| १२ | स्फुट मध्यम ग्रह A | .. | | २५८·४३०६ | | १८३·९१६० |

अनुक्रमणिका

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | ग्रहांचीं नीचें | | | | | | |
| १३ | शके १८०० क्षपक | | .. | ४ | २५८·६८३० | ४८ | ५३·४३३० |
| १४ | गति १ चक्र | | .. | ४ | ०·०६२३ | ४८ | ०·०२७५ |
| १५ | गति ९ वर्षे | | .. | ४ | ०·०२९५ | ४८ | ०·०१३० |
| १६ | गति ९ महिने | | .. | ४ | ०·००२४ | ४८ | ०·००११ |
| १७ | इष्ट कालीं नीच भोग .. | B | .. | | २५८·७७७२ | | ५३·४७४६ |
| | ग्रहांचीं पातस्थानें | | | | अयनांश | | |
| | शके १८०० क्षेपक | | .. | ५ | २२·१४२५ | ५० | २४·७४६० |
| | गति १ चक्र | | .. | ५ | ·२६५० | ५० | —·०४०० |
| | गति ९ वर्षे | | .. | ५ | ·१००३ | ५० | —·०१९० |
| | गति ९ महिने | | .. | ५ | ·१२५६ | ५० | —·००१६ |
| १८ | इष्ट कालीं ग्रहांचे पात .. | C | .. | | २२·५४३४ | | २४·६८५४ |

### उज्जयिनी काल घटका २७ पळें १४ पौष कृ. २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ यावेळेचे ग्रह

| क्रमांक | न्यास १ ला. मध्यम गणित | | | कोष्टक | शुक्र | कोष्टक | मंगळ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | | | | |
| १ | चै. शु. १ दा. शके १८००, क्षेपक | | .. | ६३ | ११५·४६६७ | ७५ | ६९·२००० |
| २ | १ चक्रगति | | .. | ६३ | ३१८·७८५६ | ७५ | ३६·७८८६ |
| ३ | ३००० दिनगति | | .. | ६३ | १२६·३९१४ | ७५ | १३२·०९३८ |
| ४ | ५०० दिनगति | | .. | ६३ | ८१·०६५२ | ७५ | २६२·०१५६ |
| ५ | ६० दिनगति | | .. | ६३ | ९६·१२७८ | ७५ | ३१·४४१९ |
| ६ | १० तासगति | | .. | ६३ | ०·६६७६ | ७५ | ·२१८३ |
| ७ | ५४ मिनिटगति | | .. | ६३ | ०·०६०१ | ७५ | ·०१९७ |
| ८ | निज मध्यम भोग | भ | .. | | ९८·५६४४ | | १७१·७७७७ |
| ९ | मोठा आकर्षण संस्कार श. १८२९ | | .. | | | | |
| १० | लहान संस्कार, उप. (गु — श) — ९८·४७ | | .. | | | | |
| ११ | (गु — २ × श) — उप. १२८·७८ | | .. | | | | |
| १२ | स्फुट मध्यम ग्रह .. | A | .. | | ९८·५६४४ | | १७१·७७७७ |

अनुक्रमणिका

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | ग्रहांचीं नीचें | | | | | | |
| १३ | शके १८०० क्षेपक | | .. | ६४ | १०७·६६६७ | ७६ | ३११·६८०० |
| १४ | गति १ चक्र | | .. | ६४ | — ·००७१ | ७६ | ·०८१२ |
| १५ | गति ९ वर्षे | | .. | ६४ | — ·००७३ | ७६ | ·०४२३ |
| १६ | गति ९ महिने | | .. | ६४ | — ·०००३ | ७६ | ·००३५ |
| १७ | इष्ट कालीं नीच भोग .. | B | .. | | १०७·६५४८ | | ३११·८१५० |
| | ग्रहांचीं पातस्थानें | | | | | | |
| | शके १८०० क्षेपक | | .. | ६५ | ५३·४३३६ | ७७ | २६·४३०० |
| | गति १ चक्र | | .. | ६५ | — ·१००८ | ७७ | — ·१२०१ |
| | गति ९ वर्षे | | .. | ६५ | — ·०४७७ | ७७ | — ·०५६१ |
| | गति ९ महिने | | .. | ६५ | — ·००४० | ७७ | — ·००४७ |
| १८ | इष्ट कालीं ग्रहांचे पात .. | C | .. | | ५३·२८११ | | २६·२४८३ |



अनुक्रमणिका

**उज्जयिनी काल घटका २७ पळे १४, पौष कृ. २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्यास १ ला. मध्यम गणित | | | कोष्टक | गुरु | कोष्टक | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | | अंश | | अंश |
| १ | चै. शु. १ दा. शके १८००, क्षेपक | | .. | ८७ | २७५·६६६७ | १०१ | ३३८·३५०० |
| २ | १ चक्रगति | | .. | ८७ | २१६·६५२६ | १०१ | २३२·२१०० |
| ३ | ३००० दिनगति | | .. | ८७ | २४९·२७३६ | १०१ | १००·३७९० |
| ४ | ५०० दिनगति | | .. | ८७ | ४१·५४५६ | १०१ | १६·७२९८ |
| ५ | ६० दिनगति | | .. | ८७ | ४·९८५५ | १०१ | २·००७६ |
| ६ | १० तासगति | | .. | ८७ | ०·०३४६ | १०१ | ०·०१३९ |
| ७ | ५४ मि. टगति | | .. | ८७ | ०·००३१ | १०१ | ·००१३ |
| ८ | निज मध्यम भोग | .. म | .. | | ६८·१६१७ | | ३२९·६९१९ |
| ९ | मोठा आकर्षण संस्कार श. १८२९ | | .. | ८८ | + ·२३०० | १०२ | — ·५४०० |
| १० | लहान संस्कार, उप. (गु — श) = ९८.४७ | | .. | ८९ | — ·०५०० | १०३ | + ·०६०० |
| ११ | (गु — २ × श) = उप. १२८·७८ | | .. | | | | |
| १२ | स्फुट मध्यम ग्रह | .. A | .. | | ६८·३४१७ | | ३२९·२११६ |

## ग्रहांचे नीचें

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १३ | शके १८०० क्षेपक | | .. | ९० | ३५०·२१६७ | १०३ | ६८·४५०० |
| १४ | गति १ चक्र | | .. | ९० | ०·०४०७ | १०३ | ·१०६९ |
| १५ | गति ९ वर्षे | | .. | ९० | ०·०१९३ | १०३ | ·०५०६ |
| १६ | गति ९ महिने | | .. | ९० | ०·००१६ | १०३ | ·००४२ |
| १७ | इष्ट कालीं नीच भोग .. | B | .. | | ३५०·२७८३ | | ६८·६११७ |

## ग्रहांचीं पातस्थानें

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | शके १८०० क्षेपक | | .. | ९१ | ७७·०६६७ | १०४ | ९०·४८३३ |
| | गति १ चक्र | | .. | ९१ | — ·०७३२ | १०४ | — ·०७१५ |
| | गति ९ वर्षे | | .. | ९१ | — ·०३४७ | १०४ | — ·०३३९ |
| | गति ९ महिने | | .. | ९१ | — ·००२९ | १०४ | — ·००२८ |
| १८ | इष्ट कालीं ग्रहांचे पात .. | C | .. | | ७६·९५५९ | | ९०·३७५१ |

## उज्जयिनी काल २७ घटि १४ पळे पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारिस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह

| क्रमांक | न्यास १ ला. मध्यम गणित | | कोष्टक | वरुण | कोष्टक | इन्द्र |
|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | अं | | अं |
| १ | चै. शु. १ दा. शके १८००, क्षेपक | .. | ११४ | १२७·३५४७ | १२६ | १५·०७७० |
| २ | १ चक्रगति | .. | ११४ | ८१·४११८ | १२६ | ४१·५१४६ |
| ३ | ३००० दिनगति | .. | ११४ | ३५·११२४ | १२६ | १७·१६५७ |
| ४ | ५०० दिनगति | .. | ११४ | ५·८६५४ | १२६ | २·११९० |
| ५ | ६० दिनगति | .. | ११४ | ·७०३८ | १२६ | ०·३५८९ |
| ६ | १० तासगति | .. | ११४ | ·००४९ | १२६ | ०·००२५ |
| ७ | ५४ मिनिटगति | .. | ११४ | ·०००४ | १२६ | ०·०००२ |
| ८ | निज मध्यमभोग .. म | .. | | २५०·९३३४ | | ७७·८९०० |
| ९ | मोठा आकर्षण संस्कार श. १८२९ | .. | | | | |
| १० | लहान संस्कार, उप. (गु — श) = ९८·४७ | .. | | | | |
| ११ | (गु — २ × श) = उप. १२८·७८ | .. | | | | |
| १२ | स्फुट मध्यम ग्रह .. A | .. | | २५०·९३३४ | | ७७·८९०० |

अनुक्रमणिका

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | ग्रहांचीं नीचें | | | | | | |
| १३ | शके १८०० क्षेपक | | .. | ११५ | १४९·१००० | १२७ | २४·२८०० |
| १४ | गति १ चक्र | | .. | ११५ | ·०१७५ | १२७ | ·००६४ |
| १५ | गति ९ वर्षे | | .. | ११५ | ·००८३ | १२७ | ·००३० |
| १६ | गति ९ महिने | | .. | ११५ | ·०००७ | १२७ | ·०००३ |
| १७ | इष्ट कालीं नीच भोग .. | B | .. | | १४९·१२६५ | | २४·२८९७ |
| | ग्रहांचीं पातस्थानें | | | | | | |
| | शके १८०० क्षेपक | | .. | ११६ | ५१·०३०० | १२८ | १०८·२३०० |
| | गति १ चक्र | | .. | ११६ | — ·१७४९ | १२८ | — ·०५६४ |
| | गति ९ वर्षे | | .. | ११६ | — ·०८२८ | १२८ | — ·०२६७ |
| | गति ९ महिने | | .. | ११६ | — ·००६९ | १२८ | — ·००२२ |
| १८ | इष्ट कालीं ग्रहांचे पात .. | C | .. | | ५०·७६५४ | | १०८·१४४७ |



अनुक्रमणिका

**उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारिस दोन प्रहर, २ जानेवारी १९२७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | स्थान २, रविमध्यगणित | | कोष्टक | रवि | कोष्टक | बुध |
|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | अंश. | | अंश. |
| | १२ व्या ओळींतील स्फु. म. ग्र. | A .. | | २५८·४३०६ | | १८३·९१६० |
| | १७ व्या ओळींतील नीचें | B .. | | २५८·७७७२ | | ५३·४७४६ |
| १९ | (A — B) = मंदकेंद्र | D .. | | ३५९·६५३४ | | १३०·४४१४ |
| | ओळ १९ तील उपकरण D वरून ग्रहांची मन्दफलें | E :.. | ७ | —०·०१२० | ५२ | +१५·१७५० |
| | १२ व्या ओळींतील | A .. | | २५८·४३०६ | | १८३·९१६० |
| २० | A मध्यें E धनर्ण करून आलेले रविमध्यग्रह-विक्षेपवृत्तावर | F | | २५८·४१८६ | | १९९·०९१० |
| | १८ व्या ओळींतील पात | C .. | | | | —२४·६८५४ |
| २१ | F = पातोन रविमध्यग्रह = | G .. | | | | १७४·४०५६ |
| | G उपकरणानें परिणति | H .. | | | ५३ | +००·०४४० |
| | २० व्या ओळींतील | F .. | | | | १९९·१९१० |
| २२ | H+F , र. म. ग्र. क्रांतिवृत्तावर | K .. | | २५८·४१८६ | | १९९·१३५० |



अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | २१ वी ओळ, G उपकरणानें आलेल्या फलाला ६० नीं गुणून | | | | ५४ | +०·९८३ |
| २३ | आलेला कलात्मक र. म. नार | L .. | | | | +४१·००४ |
| २४ | ओळ १९, D उपकरण-मंदकर्ण | M .. | १२ | ०·९८३२ | ५५ | ०·४४६५ |
| | ओळ १९, D नील रविकेंद्र ३५९·६५ | .. | | | ५६ | +०·००६५ |
| २५ | या एकाच उपकरणानें समांतरें | N .. | | | | |
| | | M+N=P | | | | ०·४५३० |
| २६ | मध्यम मंदकर्ण | Q .. | | | | −०·३८७१ |
| २७ | P−Q=दीर्घवर्तुलांगाचे गुणक | R .. | | | ५७ | +०·०६५९ |

## उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारिस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह

| क्रमांक | स्थान २, रविमध्यगणित | | कोष्टक | शुक्र | कोष्टक | मंगळ |
|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | अंश. | | अंश |
| | १२ व्या ओळींतील स्फु. म. ग्र. | A .. | | ९८·५६४४ | | १७१·७७७७ |
| | १७ व्या ओळींतील नीचें | B .. | | १०७·६५४८ | | ३११·८१५० |
| १९ | ( A — B ) = मंद केंद्र | D .. | | ३५०·९०९६ | | २१९·९६२७ |
| | १९ व्या ओळींतील उपकरण D वरून ग्रहांचीं मन्दफलें | E | ६६ | —०·१२७६ | ७८ | —६·२९५५ |
| | १२ व्या ओळींतील | A .. | | ९८·५६४४ | | १७१·७७७७ |
| २० | A मध्यें E धनर्णकरून आलेले रविमध्यग्रह-विक्षेपवृत्तावर | F | | ९८·४३६८ | | १६५·४८२२ |
| | १८ व्या ओळींतील पात | C .. | | —५३·२८११ | | —२६·२४८३ |
| २१ | F—C= — पातोन रविमध्यग्रह = | G .. | | ४५·१५५७ | | १३९·२३३९ |
| | G उपकरणानें परिणति | H .. | ६७ | —०·०५०० | ७९ | ००·०१४८ |
| | २० व्या ओळींतील | F .. | | ९८·४३६८ | | १६५·४८२२ |
| २२ | H+F, र. म. ग्र. क्रांतिवृत्तावर | K .. | | ९८·३८६८ | | १६५·४९७० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | २१ वी ओळ, G उपकरणानें आलेल्या फलाला ६० नीं गुणून | .. | ६८ | +०·२४०० | ८० | +१६·२१३९ |
| २३ | आलेला कलात्मक र. म. शर | L .. | | १४३·५२०० | | +३२·८३४० |
| २४ | ओळ १९, D उपकरण-मंदकर्ण | M .. | ६९ | ०·७१८४ | ८१ | १·६३७४ |
| | ओळ १९, D तील रविकेंद्र ३५९·६५ | | | | | |
| २५ | या एकाच उपकरणानें समांतरें | N .. | ७० | +०·०१२३ | ८२ | +०·०२५४ |
| | M+N=P | | | ०·७३०७ | | १·६६२८ |
| २६ | मध्यम मंदकर्ण | Q .. | | −०·७२३३ | | −१·५२३७ |
| २७ | P+Q=दीर्घवर्तुलांशाचे गुणक | R .. | ७१ | ०·००७४ | ८३ | +०·१३९१ |

## उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह

| क्रमांक | न्याम २, रविमध्यगणित | | कोष्टक | गुरु | कोष्टक | शनि |
|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | अंश | | अंश |
| | १२ व्या ओळींतील स्फु. म. ग्र. | A .. | | ६८·३४१७ | | ३२९·२११६ |
| | १७ व्या ओळींतील नीचें | B | | ३५०·२७८३ | | ६८·६११७ |
| १९ | (A–B) = मंदकेंद्र | D | | ०७८·०६३४ | | २६०·५९९९ |
| | १९ व्या ओळींतील उपकरण D वरून ग्रहांचीं मन्दफलें. | E | ९२ | +५·४७४२ | १०५ | −६·२९७८ |
| | १२ व्या ओळींतील. | A | | ६८·३४१७ | | ३२९·२११६ |
| | | | | ७३·८१५९ | | |
| २० | A मध्यें E धनर्ण करून आलेले रविमध्यग्रह-विक्षेपवृत्तावर. | | | | | |
| | १८ वी ओळींतील पात | F .. | | ७३·८१५९ | | ३२२·९१३८ |
| | | C .. | | −७६·९५५९ | | −९०·३७५० |
| २१ | F-C पातोन रविमध्यग्रह = | G | | ३५६·८६०० | | २३२·५३८८ |

अनुक्रमणिका

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | G उपकरणानें परिणति | H | .. | ९३ | ००·०००७ | १०६ | —००·०२५८ |
| | २० व्या ओळींतील | F | .. | | ७३·८१५९ | | ३२२·९१३८ |
| २२ | H+F, र. म. ग्र. क्रांतिवृत्तावर | | .. | | ७३·८१६६ | | ३२२·८८८० |
| २३ | २१ वी ओळ, G उपकरणानें आलेल्या फलाला | L | | | | | |
| | ६० नी गुणून आलेला कलात्मक र. म. शर. | | | ९४ | —०°·०६८५ | १०७ | —१°·९७७४ |
| | | | . | | —४·०१०० | | —११८·६४४० |
| २४ | ओळ १९, D उपकरण-मंदकर्ण | M | .. | ९५ | ५·१६२ | १०८ | ९·६६३ |
| | ओळ १९, D तील रविकेंद्र ३५२·६५ | N | .. | ९६ | +०·०८६ | १०९ | +·०१५९ |
| २५ | या एकाच उपकरणानें समांतरें | | | | | | |
| | M+N=P. | | | | ५·२४८ | | ९·८२२ |
| २६ | मध्यम मंदकर्ण | Q | .. | | —५·२०३ | | —९·५५५ |
| २७ | P-Q दीर्घवर्तुलांशाचे गुणक | R | .. | ९७ | +०·०४५ | ११० | +०·२६७ |

अनुक्रमणिका

**उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्यास २, रविमध्यगणित | | | कोष्टक | वरुण | कोष्टक | इंद्र |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | विवरण | | | | अंश | | अंश |
| | १२ व्या ओळींतील स्फु. म. ग्र. | A | .. | | २५०·९३३४ | | ७७·८९०० |
| | १७ व्या ओळींतील नांवें | B | .. | | १४९·१२६५ | | २४·२८९७ |
| १९ | (A B) = मंद केंद्र | D | .. | | १०१·८०६९ | | ५३·६००३ |
| | १९ व्या ओळींतील उपकरण D वरून ग्रहांचीं मन्दफलें | E | .. | ११७ | +५·१७१९ | १२९ | +००·७८९५ |
| | १२ व्या ओळींतील | A | .. | | २५०·९३३४ | | ७७·८९०० |
| | A मध्यें E धनर्ण करून आलेले | F | .. | | २५६·१०५३ | | ७८·६७९५ |
| २० | रविमध्यग्रह-विक्षेपवृत्तावर | | .. | | २५६·१०५३ | | |
| | १८ वी ओळींतील पात | C | .. | | ५०·७६७४ | | १०८·१४४७ |
| २१ | F-C पातोन रविमध्यग्रह = | G | .. | | २०५·३३७९ | | ३३०·५३४८ |
| | G उपकरणानें परिणति | H | .. | | ०·०००० | १३० | ०·०००० |
| | २० व्या ओळींतील | F | .. | | २५६·१०५३ | | ७८·६७९५ |
| २२ | H+F र. म. ग्र. क्रांतिवृत्तावर | K | .. | | २५६·१०५३ | | ७८·६७९५ |

अनुक्रमणिका

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | २१ वी ओळ, G उपकरणानें आलेल्या फलाला ६० नीं गुणून. | | .. | ११८ | —०°·३३०६ | १३१ | —·८७९६ |
| २३ | आलेला कलात्मक र. म. शर | L | .. | | —०१९·८४ | | —५२·६० |
| २४ | ओळ १९, D उपकरण-मंदकर्ण | M | .. | ११९ | १९·४१५ | १३२ | २९·९२० |
| | ओळ १९, D तील रविकेंद्र ३५९·६५ | N | .. | १२० | +·३१९ | १३३ | +०·५०० |
| २५ | या एकाच उपकरणानें समांतरें M+N=P. | | | | १९·७३४ | | ३०·४२० |
| २६ | मध्यम मंदकर्ण .. .. .. | Q | .. | १२१ | —१९·२१८ | | —३०·११० |
| २७ | P-Q=दीर्घवर्तुलांशाचे गुणक | R | .. | | +०·५१६ | १३४ | +००·३१० |



अनुक्रमणिका

**उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्याम ३, | भूमध्यगणित | कोष्टक | रवि | कोष्टक | बुध |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | | (३) | (४) | (५) | (६) |
| | विवरण | | | अंश | | अंश |
| | २२ व्या ओळींतील .. | .. K .. .. | | २५८·४१८६ | | १९९·१४८२ |
| २८ | K मधील स्पष्ट रवि | .. S .. .. | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| २९ | K—S = शीघ्र केन्द्र .. | .. T .. .. | | ०००·०००० | | ३००·७२९६ |
| ३० | T उपकरणानें दीर्घवर्तुलांश | .. U .. .. | | .. | | —३१·६९४९ |
| | २७ व्या ओळींतील गुणक | .. R .. .. | | | | +०·०६५९ |
| | (U × R) = दी. वर्तु. संस्कार | V .. .. | | | | —२·०८०० |
| | २९ वी ओळ. उप. T वरून इनांतरें | W .. .. | ५८ | | ५८ | —१५·५१७४ |
| | २८ व्या ओळींतील केवळ S | .. X .. .. | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| ३१ | (V+W+X) = भूम. स्प. ग्रह | .. | | २५८·४१८६ | | २४०·८२१२ |

अनुक्रमणिका

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **मूमध्य शरगणित** | | | | क |
| | २३ व्या ओळींतील र. म. शर .. L .. .. | | गुण्य ( L ) | | +४०′·९८०० |
| | २४ व्या ओळींतील, मंदकर्ण .. M .. .. | | गुणक ( M ) | | ०·४४६५ |
| | २९ वी ओळ उप. T शीघ्र कर्ण Y .. .. | ५९ | भाजक ( Y ) | ५९ | १·२४३३ |
| ३२ | $(L \times M \div Y)$=मू. म. स्प. शर .. | | भागाकार | | +१४·७१ |
| | **मूमध्यस्पष्ट दिनगति** | | | | क |
| | रविमध्यमदिनगति .. .. a .. .. | १ | [a] | | ५९·१ |
| ३३ | २९ वी ओळ उप. T; गतिफलें b .. .. | ६० | [b] | ६० | ४१′·३०४० |
| ३४ | $(a+b)$=मूम. दृश्य. दिनगति .. .. | | $(a+b)$ | | १००·४०४० |
| | घन = मार्गी ; ऋण = वक्री. | | | | + |

**उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्यास ३, मुमध्यगणित | | कोष्टक | शुक्र | कोष्टक | मंगळ |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | | (७) | (८) | (९) | (१०) |
| | विवरण | | | अंश | | अंश |
| | २२ व्या ओळींतील | K | | ९८·३८६८ | | १६५·४९७० |
| २८ | K मधील स्पष्ट रवि | S | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| २९ | K-S=शीघ्रकेन्द्र | T | | १९९·९६८० | | २६७·०७८४ |
| ३० | T उपकरणानें दीर्घवर्तुलांश | U | | —११९·६३५६ | | —१८·२००० |
| | २७ व्या ओळींतील गुणक | R | | +·००७४ | | +·१३९१ |
| | (U×R)=दी. वर्तु. संस्कार | V | | —०·८८०० | | —२·५३ |
| | २९ वी ओळ. उप. T वरून इनांतरें | W | ७२ | —३७·६००० | ८४ | —५८·८३ |
| | २८ व्या ओळींतील केवळ S : | X | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| ३१ | (V+W+X)=भूम. स्प. ग्रह. | | | २१९·९३८६ | | १९७·०५८६ |

अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | भूमध्यशरगणित | | | क | | क |
| | २३ व्या ओळीतील र. म. शर | L | | +१४३′·५२०० | | +७२′·८३४० |
| | २४ व्या ओळींतील, मंदकर्ण | M | | ०·७१८५ | | १·६३७४ |
| | २९ वी ओळ उप. T शीघ्रकर्ण | Y | ७३ | ०·४०४७ | ८५ | १·७८८ |
| ३२ | $(L \times M \div Y)$ = भू. म. स्प. शर | | | २५५·०६०० | | ६६·९८ |
| | भूमध्यस्पष्ट दिनगति | | | क | | क |
| | रविमध्यम दिनगति | a | | ५९·१००० | | ५९·१ |
| ३३ | २९ वी ओळ उप. T ; गतिफलें | b | ७४ | —३३·९३०० | ८६ | —९९·७ |
| ३४ | $(a+b)$ = भूम. दृश्य. दिन गति<br>धन = मार्गी ; ऋण = वक्री. | | | —२५·१७००<br>+ | | —३९·४<br>+ |

**उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्यास ३, भूमध्यगणित | | | | कोष्टक | गुरु | कोष्टक | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | | | | (११) | (१२) | (१३) | (१४) |
| | विवरण | | | | | अंश | | अंश |
| | २२ व्या ओळींतील | K | .. | .. | | ७३·८१६६ | | ३२२·८८८० |
| २८ | K मधील स्पष्ट रवि | S | .. | .. | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| २९ | K—S= शीघ्रकेंद्र | T | .. | .. | | १७५·३९८० | | ०६४·४६९४ |
| ३० | T उपकरणानें दीर्घवर्तुलांश | U | .. | .. | | +·२९ | | +०·५१ |
| | २७ व्या ओळींतील गुणक | R | .. | .. | | +·००४५ | | +·२६७ |
| | (U × R)=दी. वर्तु. संस्कार | V | .. | .. | | +०·०४ | | ०·१३ |
| | २९ वी ओळ. उप. T वरून इतांतरें | W | .. | .. | ९८ | +१७३·८२ | १११ | +५८·८५ |
| | २८ व्या ओळींतील केवळ S; | X | .. | .. | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| ३१ | (V+W+X)=भूम. स्प. ग्रह | | .. | .. | | ४३२·२७८६ | | ३१६·३९८६ |

अनुक्रमणिका

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | मूमध्यशरगणित | | क | | क |
| | २३ व्या ओळींतील र. म. शर .. L .. .. | | —४′·०१०० | | —११८′·६४४० |
| | २४ व्या ओळींतील, मंदकर्ण .. M .. .. | | ५·१६२ | | ९·६६३ |
| | २९ वी ओळ. उप. T शीघ्रकर्ण Y .. .. | ९९ | ४·२०८ | ११२ | १०·०१० |
| ३२ | $(L \times M \div Y)$ = मू. म. स्प. शर .. .. | | —४·९२ | | —११४·६० |
| | मूमध्यस्पष्ट दिनगति | | क | | क |
| | रविमध्यमदिनगति .. a .. .. .. | | ५९·१ | | ५९·१ |
| ३३ | २९ वी ओळ. उप. T; गतिफलें b .. .. | १०० | —६७·० | ११३ | —५४·२ |
| ३४ | $(a+b)$ = मूम. दृश्य. दिनगति .. ..<br>धन=मार्गी ; ऋण=वक्री. | | —७·९<br>वक्री | | +४·९ |

**उज्जयिनी काल २७ घ. १४ प. पौष कृष्ण २ या बुधवार शके १८२८ किंवा पारीस दोन प्रहर, २ जानेवारी १९०७ या वेळेचे ग्रह**

| क्रमांक | न्यास ३, भूमध्यगणित | | | कोष्टक | वरुण | कोष्टक | इंद्र |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | | | (१५) | (१६) | (१७) | (१८) |
| | विवरण | | | | अंश | | अंश |
| | २२ व्या ओळींतील | K | | | २५६·१०५३ | | ७८·६७९५ |
| २८ | K मधील स्पष्ट रवि | S | | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| २९ | K—S=शीघ्रकेन्द्र | T | | | ३५७·६८६७ | | १८०·२६०९ |
| ३० | T उपकरणानें दीर्घवर्तुलांश | U | | | —०·०० | | —·००० |
| | २७ व्या ओळींतील गुणक | R | | | +·५१६ | | +·३१० |
| | ( U×R )=दी. वर्तु. संस्कार | V | | | —०·०० | | —०·०० |
| | २९ वी ओळ. उप. T वरून इनांतरें | W | | १२२ | —१·९० | १३५ | —१७९·७९ |
| | २८ व्या ओळींतील केवळ S; | X | | | २५८·४१८६ | | २५८·४१८६ |
| ३१ | (V+W+X)=भूम. स्प. ग्रह. | | | | २५६·५१८६ | | ७८·६२८६ |

अनुक्रमणिका

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **भूमध्यशरगणित** | | क | | क |
| | २३ व्या ओळींतील र. म. शर .. L .. .. | | —१९′·८४ | | —५२′·०६० |
| | २४ व्या ओळींतील, मंदकर्ण .. M .. .. | | १९·४१५ | | २१·९२० |
| | २९ वी ओळ. उप. T शीघ्रकर्ण .. Y .. .. | १२४ | २०·१८२ | १२६ | २१·०५४ |
| ३२ | (L×M÷Y) = भू. म. स्प. शर .. .. | | —१९·०८ | | —५४·२ |
| | **भूमध्यस्पष्टदिनगति** | | क | | क |
| | रविमध्यमदिनगति .. .. a .. .. | | ५९·१ | | ५९·१ |
| ३३ | २९ वी ओळ. उप. T ; गतिफलें b .. .. | १२५ | —५५·५ | १२७ | —६०·८ |
| ३४ | (a+b)=भूम. दृश्य. दिनगति .. .. धन=मार्गी ; ऋण=वक्री. | | +३·६ | | —१·७ वक्री. |

बुधदिनगति विशेष.—न्यास २ ओळ १९ तील बुधमंदकेन्द्र १३०·४५ या उपकरणानें ६१ व्या कोष्टकांतून गुणक काढले ते +·८२ व +·१८६ असे आले. न्यास ३ ओळ ३२ मध्यें बुधाचें गतिफल+४१·३० कला आहे व ३०० व्या ओळींत वर्तुलांश —३१·६९ आहे. यावरून :—

| | | कला |
|---|---|---|
| (१) | रविमध्यमगति .. .. .. .. .. | ५९·१ |
| (२) | (+४१·३०)×(+·८२) .. .. .. | +३३·९ |
| (३) | (—३१·७)×(·१८६) .. .. .. .. | (—)५·९ |
| | बुधाची भूमध्यदृश्यदिनगति .. .. .. | +८७·१ |



अनुक्रमणिका

# त्रिकोणमितीच्या साहाय्यानें भूमध्य ग्रहसाधन

## त्रिकोणमितीच्या साहाय्यानें सूक्ष्म ग्रहसाधन

भूमध्यगणित त्रिकोणमितीच्या सूत्राशिवाय सूक्ष्म होत नाहीं. त्रिकोणमितीचें गणित कठीण नसलें तरी त्यांत लांब लांब संख्यांचे गुणाकार-भागाकार करावे लागतात, त्यामुळें त्याचा लवकरच कंटाळा येतो. म्हणून प्रत्येक कलेच्या किंवा दर दहा दहा विकला कंसाच्या भुजज्या कोटिज्या स्पर्शरेषा ज्यांत आहेत अशा कोष्टकांचें साहाय्य घ्यावें लागतें. पण राजाश्रयाशिवाय इतके श्रम करण्यास थोडेच लोक तयार असतात. म्हणून ४/५ कलांची तफावत[1] आली तरी चालेल, असें गृहीत धरून वरील सर्व भूमध्यगणित केवळ कोष्टकावरूनच करिता येईल अशी युक्ति आम्हीं योजिली आहे.

ग्रहलाघवकारांना देखील ही अडचण चांगली कळून आली होती म्हणून आपल्या ग्रंथांत ज्या भुजज्या आपण येऊं देणार नाहीं अशी त्यांनीं ग्रंथारंभीं प्रतिज्ञा करून गणकांची काळजी दूर केली आहे.

> यद्यप्यकार्षुरुरव: करणानि धीरा
> स्तेपुज्यकाधनुरपास्य न सिद्धिरस्मात् ।
> ज्याचापकर्मरहितं सुलघुप्रकारं
> कर्तुं ग्रहप्रकरणं स्फुटमुद्यतोऽस्मि ।।

—गणेश दैवज्ञ.

श्रीभास्कराचार्यांच्या करणकुतूहलास अनुलक्षून हा दोष दाखविण्यांत आला आहे असें दिसतें.

कै. केरोपंत छत्रे यांनीं आपल्या ग्रहसाधनकोष्टक ग्रंथांत भूमध्यगणितांत ज्या चापकर्माची जरुरी ठेविली असल्यामुळें त्यांना ग्रंथ मागें पडला आहे.

आम्हीं या पुस्तकांत गणित करण्याचे दोन्हीं मार्ग खुले ठेविले आहेत.
म्हणून ज्यांस जास्त सूक्ष्मता पाहिजे असेल त्यांनीं पुढें सांगितल्याप्रमाणें गणित करावें.

### अंतर्ग्रह:—बुध व शुक्र

रविमध्यग्रहांतून स्पष्टरवि वजा करावा, म्हणजे बाकी **शीघ्र केंद्र** होतें. शीघ्रकेंद्राची भुजज्या व कोटिज्या आणून त्यांनीं ग्रहाच्या मंदकर्णास निरनिराळे गुणावे. गुणाकार अनुक्रमें **लंब** व **अवलंब** होतात.

---

[1] स्वल्पांतरत्वाद्बहुपयोगात्प्रसिद्धभावाच्च बहुप्रयासात् ।
ग्रंथस्य तज्ज्ञगुरुताभयेन यस्त्यज्यतेऽर्थो न स दूषणाय ।। —सि. शि. म.

अनुक्रमणिका

## पद्धति

रविमंदकर्णात अवलंब धनर्ण करून **स्फुटावलंब** आणावा. लंब व स्फुटावलंब यांच्या वर्गाच्या बेरजेचें जें वर्गमूळ येईल तेवढा ग्रहाचा **शीघ्रकर्ण** होतो.

लंबास शीघ्रकर्णानें भागावें. भागाकार शीघ्रफलाची भुजज्या होते. भुजज्येवरून उलट धनु (कंस) आणावे तें **शीघ्रफल** होतें.

शीघ्रफलाचा **स्पष्टरवीला** संस्कार करावा म्हणजे भूमध्य दृश्य **अंतर्ग्रह** येतो.

रविमध्यशराला मंदकर्णानें गुणून शीघ्रकर्णानें भागावें. भागाकार **भूमध्यशर** होतो.

## बहिर्ग्रहः—मंगळ, गुरु, शनि, वरुण, इंद्र

स्पष्टरवींतून रविमध्यग्रह वजा करावा. बाकी **विलोम** शीघ्रकेंद्र होतें.

विलोम शीघ्रकेंद्राच्या भुजज्या व कोटिज्या आणून त्यांनीं रवीच्या मंदकर्णास निरनिराळें गुणावें. गुणाकार अनुक्रमें **लंब व अवलंब** होतात.

ग्रहमंदकर्णात अवलंब धनर्ण करून **स्फुटावलंब** आणावा.

लंब व स्फुटावलंब यांच्या वर्गाच्या बेरजेचे वर्गमुळाएवढा शीघ्रकर्ण होतो.

लंबास शीघ्रकर्णानें भागावें. भागाकार शीघ्रफलाची भुजज्या होतो. भुजज्येवरून धनु आणावे. तें शीघ्रफल होतें.

शीघ्रफलाचा रविमध्य **ग्रहाला** संस्कार करावा म्हणजे भूमध्य **बहिर्ग्रह** होतो.

रविमध्यशराला मंदकर्णानें गुणून शीघ्रकर्णानें भागावें. भागाकार **भूमध्यशर** होतो.

**उदाहरण १ लें**—अंतर्ग्रह शुक्राचे-पूर्वोक्त उदाहरणांत (न्यास २/३ पाहा.) रविमध्यशुक्र ९८°·४४, स्पष्टरवि २५८°.४२, शुक्रमंदकर्ण ·७१८५, रविमंदकर्ण ·९८३२ अशीं मानें आहेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| रविमध्यशुक्र | .. | .. | ९८° | २६′·४ |
| स्पष्टरवि | .. | .. | −२५८ | २५·२ |
| शीघ्र केंद्र | .. | .. | २०० | १′·२ |

अनुक्रमणिका

| | | | |
|---|---|---|---|
| | २०° १′·२ | | |
| शीघ्र केंद्र भुज | १९° ५९′·४ | | |
| शीघ्र केंद्र भुजज्या | −·३४१०५ | कोटिज्या .. | −·९४००५ |
| शुक्रमंदकर्ण .. | ·७१८४० | | ·७१८४० |
| गुणाकार लंब | −·२४५०१ | अवलंब | −·६७५३३ |
| रविमंदकर्ण .. | .. | .. .. .. | ·९८३२० |
| लंब | −·२४५०१ | स्फुटावलंब | ·३०७८७ |

शीघ्रकर्ण $= \sqrt{(-\cdot२४५०१)^२ + (-\cdot३०७०७)^२} = \cdot३९३४६$

शीघ्रफलज्या $= (-\cdot२४५०१) \div (\cdot३९३४६) = -\cdot६२२७१$

| | | |
|---|---|---|
| शीघ्रफल = शीघ्रफल भुजज्येचा कंस | .. .. | − ३८° ३१′ |
| मंदस्पष्टरवि | .. .. .. .. | २५८ २५ |
| भूमध्यस्पष्ट शुक्र | .. .. .. .. | २१९ ५४ |

**उदाहरण २ रें. बहिर्वर्ह मंगळाचे**—पूर्वोक्त उदाहरणांत न्यास २/३ पाहा. रविमध्य मंगळ १६५°·५१, स्पष्टरवि २५८°·४२ मंगळ मंदकर्ण १·६३७४, रविमंदकर्ण ·९८३२.

| | | | |
|---|---|---|---|
| स्पष्टरवि | .. .. .. .. | | २५८° २५′·२ |
| रविमध्य मंगळ | .. .. .. .. | | −१६५ ३०·६ |
| विलोमशीघ्र केंद्र | .. .. .. .. | | ९२ ५४·६ |
| शीघ्रकेंद्र भुजज्या | +·९९८७२ | कोटिज्या | − ·०५०५९ |
| रविमंदकर्ण | ·९८३२ | .. .. | ·९८३२ |
| गुणाकार लंब | +·९८१९४ | अवलंब | − ·०४९७४ |
| मंगळमंदकर्ण | .. .. | .. .. | १·६३७४० |
| लंब | +·९८१९४ | स्फुटावलंब | १·५८७६६ |

शीघ्रकर्ण $= \sqrt{(\cdot९८१९४)^२ + (१\cdot५८७६६)^२} = १\cdot८६६८$

शीघ्रफलज्या $= +(\cdot९८१९४ \div १\cdot८६६८) = +\cdot५२५९२$

| | | |
|---|---|---|
| शीघ्रफल | .. .. .. .. | + ३१° ४४′·० |
| रविमध्य मंगळ | .. .. .. .. | १६५ ३०·६ |
| भूमध्य मंगळ | .. .. .. .. | १९७ १४·६ |

अनुक्रमणिका

टीप.—वरील गणितांत लाग्रतमाचा उपयोग केला तर थोडक्या श्रमांत काम होतें. शीघ्रकेंद्र १८० अंशापेक्षां कमी असेल तर शीघ्रफल धन असतें, पण १८० अंशापेक्षां अधिक असेल तर शीघ्रफल ऋण असतें असें निराळें सांगण्याची आवश्यकता नाही. कारण कंस ०°–१८०° असेल तर त्याची भुजज्या धन असते, पण १८०°–३६०° असेल तर त्याची भुजज्या ऋण असते. तसेंच कंस २७०°–९०° असेल तर कोटिज्या धन, ९०°–२७०° असेल तर कोटिज्या ऋण असते असें त्रिकोणमितींत सांगितलें असतेंच.

वर त्रिकोणमितीनें केलेल्या गणितावरून शुक्राचा भूमध्य भोग २१९° ·५४′ येतो आणि मंगळाचा १९७° १४′·६ येतो. या प्रत्येकांत अयनांश २२° ३२′·६ मिळविले तर शुक्राचा सायन भूमध्य भोग २४२° २६′·६ येतो आणि मंगळाचा २१९° ४७′·२ येतो.

हे भोग मांडिले तर ते परेंच गणिताशीं पूर्वीच्या भोगापेक्षां जास्त जमतात असें दिसून येईल.

अर्थात् यापुढें गणकांनीं त्रिकोणमितीचा व घातांकांचा (लाग्रतम) पद्धतशीर अभ्यास करून हीच सूक्ष्म पद्धति सर्वत्र अमलांत आणावी हेंच श्रेयस्कर होय.

---

## विषुवांश व क्रांति

### भोग व शर यावरून विषुवांश व क्रांति आणणें

मागें गणित करून जे भोग व शर आणिले आहेत ते क्रांतिवृत्ताच्या पातळी (Plan of the Ecliptic) च्या संबंधाचे अवच्छेदक आहेत. पण क्रांतिवृत्ताची पातळी क्षितिज पातळीवर नेहमीं चळत असते. म्हणजे या दोन पातळ्यांमधील कोन व सपात क्षणोक्षणीं बदलत असतात. त्यामुळें प्रत्यक्ष वेधावरून ग्रहांचे भोग व शर आणितां येत नाहींत. पण क्षितिजाशीं ज्याची पातळी स्थिर असते अशा विषुववृत्ताच्या पातळीच्या (Plan of the Celestial Equator) संबंधाचे अवच्छेदक (Co-ordinates) जे विषुवांश व क्रांति त्यांचीं मानें मात्र वेधावरून आणितां येतात. म्हणून ग्रहगणित वेधाशीं कितपत जुळतें तें पाहण्यासाठीं विषुवांश व क्रांति आणणें जरूर आहे.

ग्रहांच्या भोगशरावरून त्यांचे विषुवकाल व क्रांति यांचीं सूक्ष्म मानें आणावयाचीं असतील तर गोलीय त्रिकोणमितीच्या सूत्राचा (Formula) उपयोग केला पाहिजे. ती रीति ज्योतिर्गणिताच्या ३९२ पृष्ठावर दिली आहे. येथें एखाद्या कलेची कसर आली तरी चालेल असें गृहीत धरून पुढील गणितपद्धति सांगतली आहे.

ग्रहाच्या भोगांत अयनांश मिळवून सायन भोग आणावे. या उपकरणानें २० व्या व २१ व्या कोष्टकांतून **भुज** व **कर्ण** नांवाचे दोन गुणक आणून त्यांनीं इष्टग्रहाच्या शरास पृथक् गुणून त्याच नांवाचीं दोन फलें आणावीं.

इष्टग्रहाच्या सायन भोगास भुजफलाचा संस्कार करावा. या भुजफलसंस्कृत सायन भोगानें २२ व्या कोष्टकांतून घटिकादि **विषुवकाल** (Right Ascension) आणावा यास ४ नीं गुणून १० नीं भागिलें तर अवरमिनिटात्मक **विषुवकाल** येतो. भुजफलसंस्कृत सायन भोगानें २३ व्या कोष्टकांतून क्रांति आणून तिला कर्णफलाचा संस्कार करावा म्हणजे **स्पष्टक्रांति** येते.

**उदाहरण.**—गुरूचा भोग ७२ अं. ४२ क. व शर −४·८ क. आहे. तर यावरून त्याचा विषुवकाल व क्रांति आणा. इष्ट दिवशीं अयनांश २२°·५४ आहेत. (९ न्या. १ पाहा) हे गुरूच्या सायन भोगांत मिळवून आला सायन गुरु ९५° १४′·४. यावरून २० व्या व २१ व्या कोष्टकांतून भुजगुणक + ·०४० व कर्णगुणक १·००० असे येतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| गुरूचा शर | .. | | −०° ४·८ | | −०° ४·८ |
| गुणक .. | .. | भुज .. | + ·०४० | कर्ण .. | +१·००० |
| गुणाकार | .. | भुजफल | −० ०·२ | कर्णफल | −० ४·८ |
| सायन गुरु | .. | | ९५ १४·४ | | |
| कोष्टक २२/२३ चें उपकरण | | | ९५ १४·२ | | |
| यावरून विषुवकाल | .. | | १५ घ. ५७·१५ | क्रांति .. | +२३ २१·० |
| | | | × ·४ | | |
| होरात्मक | .. | | ६ हो. २२·८मि. | स्फुट क्रांति | +२३ १६·२ |
| परैचगणित | .. | | ६ हो. २३·३मि. | | +२३ १५·३ |

ग्रहांचे विषुवांश आणि क्रांति हीं त्यांच्या वेधांचीं मुख्य साधनें आहेत. यांच्या साहाय्यानें ग्रहांचे दैनंदिन अस्तोदयकाल, याम्योत्तर लंघनकाल, उन्नतांश, दिगंश, दिनमान इत्यादि गोष्टींचें गणित करितां येतें. ज्यांस संस्कृताचें ज्ञान आहे त्यांनीं हे विषय आमच्या ज्योतिर्गणितांत अथवा केतकी ग्रहगणितांत पहावे. अथवा ज्यांस इंग्रजी भाषेचें ज्ञान आहे त्यांनीं कोणत्याहि इंग्रजी Spherical Astronomy तील Transformation of Co-ordinates हें प्रकरण पाहावें.

## कोष्टक ४५ वें

# बुधाची मध्यम गति

### उपकरणें—क्षेपक, चक्रें व अहर्गण

### अंशात्मक गति

उज्जयिनी शके १८०० चैत्र शु. प्रतिपदा —दि. ३-४-१८७८ बुधवारीं मध्यम सूर्योदयीं (भारतीय स्टँडर्ड टाइम प्रातः ६ तास, २७ मिनिटें) बुधाचें मध्यम स्थान म्हणजे क्षेपक—५२·५०००.

| चक्रें | गति | अहर्गण | गति | अहर्गण | गति |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३२०·८३१३ | १ | ४·०९२३ | १०० | ४९·२३२९ |
| २ | २८१·६६२६ | २ | ८·१८४७ | २०० | ९८·४६७८ |
| ३ | २४२·४९३९ | ३ | १२·२७७० | ३०० | १४७·७०१६ |
| ४ | २०३·३२५२ | ४ | १६·३६९४ | ४०० | १९६·९३५५ |
| ५ | १६४·१५६६ | ५ | २०·४६१७ | ५०० | २४६·१६९४ |
| ६ | १२४·९८७९ | ६ | २४·५५४० | ६०० | २९५·४०३३ |
| ७ | ८५·८१९२ | ७ | २८·६४६४ | .. | .. |
| ८ | ४६·६५०५ | ८ | ३२·७३८७ | .. | .. |
| ९ | ७·४८१८ | ९ | ३६·८३१० | ७०० | ३४४·६३७२ |
| | | | | ८०० | ३३·८७१० |
| १० | ३२८·३१३१ | १० | ४०·९२३४ | ९०० | ८३·१०४९ |
| ११ | २८९·१४४४ | ११ | ४५·०१५७ | .. | .. |
| १२ | २४९·९७५७ | १२ | ४९·१०८१ | .. | .. |
| १३ | २१०·८०७० | १३ | ५३·२००४ | १००० | १३२·३३८८ |
| १४ | १७१·६३८३ | १४ | ५७·२९२८ | २००० | २६४·६७७६ |
| १५ | १३२·४६९७ | १५ | ६१·३८५१ | ३००० | ३७·०१६४ |
| १६ | ९३·३०१० | | | | |
| १७ | ५४·१३२३ | १६ | ६५·४७७४ | .. | .. |
| १८ | १४·९६३६ | १७ | ६९·५६९८ | .. | .. |
| १९ | ३३५·७९४९ | १८ | ७३·६६२१ | ४००० | १६९·३५५२ |
| २० | २९६·६२६२ | १९ | ७७·७५४४ | ५००० | ३०१·६९४१ |
| ३० | २६४·९३९३ | २० | ८१·८४६८ | ६००० | ७४·०३२९ |
| ४० | २३३·२५२४ | ३० | १२२·७७०२ | .. | .. |
| ५० | २०१·५६५५ | ४० | १६३·६९३६ | दिन | .. |
| ६० | १६९·८७८६ | ५० | २०४·६१६९ | १३ | ५३·२००४ |
| ७० | १३८·१९१७ | ६० | २४५·५४०३ | १४ | ५७·२९२७ |
| ८० | १०६·५०४८ | ७० | २८६·४६३७ | १५ | ६१·३८५१ |
| ९० | ७४·८१७९ | ८० | ३२७·३८७१ | १६ | ६५·४७७४ |
| १०० | ४३·१३१० | ९० | ८·३१०५ | | |

## कोष्टक ४६ वें

### बुध

**तास, मिनिटें, सेकंदें यांची मध्यम गति—अंशात्मक**

| तास | गति अंश | मि. | गति अंश | मि. | गति अंश | से. | गति अंश | से. | गति अंश |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ०·१७०५ | १ | ०·००२८ | ३१ | ०·०८८१ | १ | ०·०००० | ३१ | ०·००१५ |
| २ | ०·३४१० | २ | ०·००५७ | ३२ | ०·०९०९ | २ | ०·०००१ | ३२ | ०·००१५ |
| ३ | ०·५११५ | ३ | ०·००८५ | ३३ | ०·०९३८ | ३ | ०·०००१ | ३३ | ०·००१६ |
| ४ | ०·६८२१ | ४ | ०·०११४ | ३४ | ०·०९६९ | ४ | ०·०००२ | ३४ | ०·००१६ |
| ५ | ०·८५२६ | ५ | ०·०१४२ | ३५ | ०·०९९५ | ५ | ०·०००२ | ३५ | ०·००१७ |
| ६ | १·०२३१ | ६ | ०·०१७१ | ३६ | ०·१०२३ | ६ | ०·०००३ | ३६ | ०·००१७ |
| ७ | १·१९३६ | ७ | ०·०१९९ | ३७ | ०·१०५२ | ७ | ०·०००३ | ३७ | ०·००१८ |
| ८ | १·३६४१ | ८ | ०·०२२७ | ३८ | ०·१०८० | ८ | ०·०००४ | ३८ | ०·००१८ |
| ९ | १·५३४६ | ९ | ०·०२५६ | ३९ | ०·११०८ | ९ | ०·०००५ | ३९ | ०·००१८ |
| १० | १·७०५१ | १० | ०·०२८४ | ४० | ०·११३७ | १० | ०·०००५ | ४० | ०·००१९ |
| ११ | १·८७५७ | ११ | ०·०३१३ | ४१ | ०·११६५ | ११ | ०·०००५ | ४१ | ०·००१९ |
| १२ | २·०४६२ | १२ | ०·०३४१ | ४२ | ०·११९४ | १२ | ०·०००६ | ४२ | ०·००२० |
| १३ | २·२१६७ | १३ | ०·०३६९ | ४३ | ०·१२२२ | १३ | ०·०००६ | ४३ | ०·००२० |
| १४ | २·३८७२ | १४ | ०·०३९८ | ४४ | ०·१२५० | १४ | ०·०००७ | ४४ | ०·००२१ |
| १५ | २·५५७७ | १५ | ०·०४२६ | ४५ | ०·१२७९ | १५ | ०·०००७ | ४५ | ०·००२१ |
| १६ | २·७२८२ | १६ | ०·०४५५ | ४६ | ०·१३०७ | १६ | ०·०००८ | ४६ | ०·००२२ |
| १७ | २·८९८७ | १७ | ०·०४८३ | ४७ | ०·१३३६ | १७ | ०·०००८ | ४७ | ०·००२२ |
| १८ | ३·०६९३ | १८ | ०·०५१२ | ४८ | ०·१३७४ | १८ | ०·०००९ | ४८ | ०·००२३ |
| १९ | ३·२३९८ | १९ | ०·०५४० | ४९ | ०·१३९३ | १९ | ०·०००९ | ४९ | ०·००२३ |
| २० | ३·४१०३ | २० | ०·०५६८ | ५० | ०·१४२१ | २० | ०·०००९ | ५० | ०·००२४ |
| २१ | ३·५८०८ | २१ | ०·०५९७ | ५१ | ०·१४४९ | २१ | ०·००१० | ५१ | ०·००२४ |
| २२ | ३·७५१३ | २२ | ०·०६२५ | ५२ | ०·१४७८ | २२ | ०·००१० | ५२ | ०·००२५ |
| २३ | ३·९२१८ | २३ | ०·०६५४ | ५३ | ०·१५०६ | २३ | ०·००११ | ५३ | ०·००२५ |
| २४ | ४·०९२३ | २४ | ०·०६८२ | ५४ | ०·१५३५ | २४ | ०·००११ | ५४ | ०·००२६ |
| | | २५ | ०·०७१० | ५५ | ०·१५६३ | २५ | ०·००१२ | ५५ | ०·००२६ |
| | | २६ | ०·०७३९ | ५६ | ०·१५९१ | २६ | ०·००१२ | ५६ | ०·००२७ |
| | | २७ | ०·०७६७ | ५७ | ०·१६२० | २७ | ०·००१३ | ५७ | ०·००२७ |
| | | २८ | ०·०७९६ | ५८ | ०·१६४८ | २८ | ०·००१३ | ५८ | ०·००२७ |
| | | २९ | ०·०८२४ | ५९ | ०·१६७७ | २९ | ०·००१४ | ५९ | ०·००२८ |
| | | ३० | ०·०८५३ | ६० | ०·१७०५ | ३० | ०·००१४ | ६० | ०·००२८ |

अनुक्रमणिका

## कोष्टक ४७ वें

### बुध—घटि, पळें, विपळें यांतील मध्यम गति

| घटि | घटिगति अंश | घटि | घटिगति अंश | पळें | पळगति अंश |
|---|---|---|---|---|---|
| १ | ०·०६८२ | ३१ | २·११४४ | १ | ०·००११ |
| २ | ०·१३७४ | ३२ | २·१८२६ | २ | ०·००२३ |
| ३ | ०·२०४६ | ३३ | २·२५०८ | ३ | ०·००३४ |
| ४ | ०·२७२८ | ३४ | २·३१९० | ४ | ०·००४५ |
| ५ | ०·३४१० | ३५ | २·३८७२ | ५ | ०·००५७ |
| ६ | ०·४०९२ | ३६ | २·४५५४ | ६ | ०·००६८ |
| ७ | ०·४७७४ | ३७ | २·५२३६ | ७ | ०·००८० |
| ८ | ०·५४५६ | ३८ | २·५९१८ | ८ | ०·००९१ |
| ९ | ०·६१३९ | ३९ | २·६६०० | ९ | ०·०१०२ |
| १० | ०·६८२१ | ४० | २·७२८२ | १० | ०·०११४ |
| ११ | ०·७५०३ | ४१ | २·७९६४ | ११ | ०·०१२५ |
| १२ | ०·८१८५ | ४२ | २·८६४६ | १२ | ०·०१३६ |
| १३ | ०·८८६७ | ४३ | २·९३२८ | १३ | ०·०१४८ |
| १४ | ०·९५४९ | ४४ | ३·००१० | १४ | ०·०१५९ |
| १५ | १·०२३१ | ४५ | ३·०६९३ | १५ | ०·०१७१ |
| १६ | १·०९१३ | ४६ | ३·१३७५ | १६ | ०·०१८२ |
| १७ | १·१५९५ | ४७ | ३·२०५७ | १७ | ०·०१९३ |
| १८ | १·२२७७ | ४८ | ३·२७३९ | १८ | ०·०२०५ |
| १९ | १·२९५९ | ४९ | ३·३४२१ | १९ | ०·०२१६ |
| २० | १·३६४१ | ५० | ३·४१०३ | २० | ०·०२२७ |
| २१ | १·४३२३ | ५१ | ३·४७८५ | २१ | ०·०२३९ |
| २२ | १·५००५ | ५२ | ३·५४६७ | २२ | ०·०२५० |
| २३ | १·५६८७ | ५३ | ३·६१४९ | २३ | ०·०२६१ |
| २४ | १·६३६९ | ५४ | ३·६८३१ | २४ | ०·०२७३ |
| २५ | १·७०५१ | ५५ | ३·७५१३ | २५ | ०·०२८४ |
| २६ | १·७७३३ | ५६ | ३·८१९५ | २६ | ०·०२९६ |
| २७ | १·८४१६ | ५७ | ३·८८७७ | २७ | ०·०३०७ |
| २८ | १·९०९८ | ५८ | ३·९५५९ | २८ | ०·०३१८ |
| २९ | १·९७८० | ५९ | ४·०२४१ | २९ | ०·०३३० |
| ३० | २·०४६२ | ६० | ४·०९२३ | ३० | ०·०३४१ |

## कोष्टक ४७ वें—चालू

| पळें | पळगति अंक | विपळें | विपळगति अंक | विपळें | विपळगति अंक |
|---|---|---|---|---|---|
| ३१ | ०·०३५२ | १ | ०·०००० | ३१ | ०·०००६ |
| ३२ | ०·०३६४ | २ | ०·०००० | ३२ | ०·०००६ |
| ३३ | ०·०३७५ | ३ | ०·०००० | ३३ | ०·०००७ |
| ३४ | ०·०३८६ | ४ | ०·०००० | ३४ | ०·०००७ |
| ३५ | ०·०३९८ | ५ | ०·०००१ | ३५ | ०·०००७ |
| ३६ | ०·०४०९ | ६ | ०·०००१ | ३६ | ०·०००७ |
| ३७ | ०·०४२१ | ७ | ०·०००१ | ३७ | ०·०००७ |
| ३८ | ०·०४३२ | ८ | ०·०००१ | ३८ | ०·०००८ |
| ३९ | ०·०४४३ | ९ | ०·०००१ | ३९ | ०·०००८ |
| ४० | ०·०४५५ | १० | ०·०००२ | ४० | ०·०००८ |
| ४१ | ०·०४६६ | ११ | ०·०००२ | ४१ | ०·०००८ |
| ४२ | ०·०४७७ | १२ | ०·०००३ | ४२ | ०·०००८ |
| ४३ | ०·०४८९ | १३ | ०·०००३ | ४३ | ०·०००८ |
| ४४ | ०·०५०० | १४ | ०·०००३ | ४४ | ०·०००८ |
| ४५ | ०·०५१२ | १५ | ०·०००३ | ४५ | ०·०००९ |
| ४६ | ०·०५२३ | १६ | ०·०००३ | ४६ | ०·०००९ |
| ४७ | ०·०५३४ | १७ | ०·०००४ | ४७ | ०·०००९ |
| ४८ | ०·०५४६ | १८ | ०·०००४ | ४८ | ०·०००९ |
| ४९ | ०·०५५७ | १९ | ०·०००४ | ४९ | ०·०००९ |
| ५० | ०·०५६८ | २० | ०·०००४ | ५० | ०·०००९ |
| ५१ | ०·०५८० | २१ | ०·०००४ | ५१ | ०·०००९ |
| ५२ | ०·०५९१ | २२ | ०·०००४ | ५२ | ०·००१० |
| ५३ | ०·०६०२ | २३ | ०·०००५ | ५३ | ०·००१० |
| ५४ | ०·०६१४ | २४ | ०·०००५ | ५४ | ०·००१० |
| ५५ | ०·०६२५ | २५ | ०·०००५ | ५५ | ०·००१० |
| ५६ | ०·०६३७ | २६ | ०·०००५ | ५६ | ०·००१० |
| ५७ | ०·०६४८ | २७ | ०·०००५ | ५७ | ०·००११ |
| ५८ | ०·०६५९ | २८ | ०·०००५ | ५८ | ०·००११ |
| ५९ | ०·०६७१ | २९ | ०·०००६ | ५९ | ०·००११ |
| ६० | ०·०६८२ | ३० | ०·०००६ | ६० | ०·००११ |

अनुक्रमणिका

